पद्यात्मक

# स्वदेशकल्याणचंद्रिका.

## कीर्तनपरकथा भाग चार.

हा ग्रंथ


**केशव सदाशिव रिसबूड संगमनेरकर**

ट्रेनिंगमास्तर

ट्रेनिंगस्कूल धुळें जि० खानदेश


यानीं

रचून तयार केला,



तो

स्वदेश कल्याणार्थ


पुणें येथें.

" ज्ञानप्रकाश छापखान्यांत छापिला. "

मिती वैशाख शुद्ध १५ शके १७९७ युवनामसंवत्सरे

ता० २० मे सन १८७५.




किंमत ८ आणे.



हा ग्रंथ

ऐक्यवर्धिका सभा धुळें

ईस

तिचे आज्ञेवरून

ग्रंथकर्त्यानें

देशकल्याणास्तव आदरपूर्वक
नजर केला आहे.

के. स. रि.

श्री

# परमेश्वरास

# प्रार्थना

## श्लोक.

[ शार्दूलविक्रीडितवृत्त. ]

सर्वेशा करुणार्णवा सुखकरा देवा जगत्पालका
सर्वां तारक एक सद्गुरु हि तूं माता पिता बालकां.
कां आम्हांवरतीच बा मग तुवां केला असा कोप हा !
आतां पाहूं नकोच अंत. सुकृपें आम्हांकडे तूं पहा. ॥ १ ॥

के. स. रि.

# प्रस्तावना.

आपल्या या हिंदुस्थान देशावर इंग्रज सरकार राज्यकर्ते झाल्यापासून आपणा हिंदु लोकांस कांहीं ऊर्जित काळ प्राप्त झाला असें म्हणण्यास हरकत नाहीं. यांच्या राज्य करण्याच्या उत्तम शैलीनें, सर्व प्रजेची दाद यथाक्रम थेटपर्यंत पोंचून हरकामाचा उलगडा यथान्याय होऊन प्रजेस सुख होऊं लागलें. त्यांच्या पूर्ण सत्तेनें, श्रम करून जी भाजी भाकर मिळेल ती खाऊन निर्धास्तपणें आपल्या मुलांबाळांसहवर्तमान आनंदांत काळ घालविण्यास सवड सांपडली. आपले राज्यकर्ते जें इंग्रज सरकार तें आपणास विद्यामृत पान करवीत गेल्यामुळें आपल्या अज्ञान दुर्धर रोगाचें नाशन होत जाऊन ज्ञानरूप तेजाची टवटवी आंगावर दिसूं लागली. व ज्ञानप्रकाश हृदयांत पडत जाऊन खरें खोटें, नीति अनीति, हिताहित, स्पष्ट नजरेस येऊं लागून लोकांचीं मनें सुमार्गीं वळत चाललीं. आणि विशेष गोष्ट ही आहे कीं, सरकार समदृष्टीनें आपल्या हिंदु प्रजेस राज्यांतील मोठमोठया अधिकारांच्या जागा देऊन तें आपणावर पूर्ण भरवंसा ठेवीत आहे. इत्यादि अनेक प्रकारचे फायदे व सुख आपणा प्रजेस झाल्यामुळें असें न्यायी व प्रजापालक जें सरकार त्याचें चिरकालत्वाविषयीं परमेश्वरास आपण प्रार्थना करावी; हें आपणा प्रजेचें कर्तव्यकर्म आहे.

अज्ञान दशेंत असतां मुलांकडून विद्याभ्यास करवून खरें खोटें काय; हिताहित कोणतें, वगैरेविषयीं ज्ञान प्राप्ति करून देणें,

हें जसें बापाचें कर्तव्य आहे, तद्वतच ह्या सरकारानें आपल्या प्रजेस विद्याभ्यासानें ज्ञानप्रकाश दाखवून तद्देशिय लोकांचे अचाट उद्योग, दीर्घयत्न, त्यांची एकी आणि स्वदेशाभिमान, इत्यादिकांचा जगमान्य कित्ता आपणास वळविण्यास दिला असतां जर आपण अविचारानें डोळे झाकून अज्ञानांधःकारांत चांचपत खुशाल जांभया देत अळसांत पडून राहिलों; तसेंच मत्सर भावानें सरळ्या भावाचाही हेवा करून स्वाहितास मुकलों; आणि एक आपलें बरें असलें, म्हणजे झालें, देशाशीं आपला संबंध तो काय? असें मानून सर्वपरी देशवैभवसुखाची इच्छा न धरिली; तर या गोष्टीस सरकारचा व तद्देशिय लोकांचा काय इलाज आहे? आईबाप जन्माचे सोबती असतात, परंतु कर्मांचे नसतात. याचप्रमाणें राजा प्रजेचा संबंध समजावा, हिताहितेत्यादिकांविषयींचा सुविचार आपला आपणच करीत गेलों, तर तद्देशिय लोकांच्या कित्यांचें वळण आपणांस लागून त्याच्या दृढाभ्यासानें आपली व देशाची सुधारणा होत जाऊन त्यांत कालें करून आपण करडे झालों, म्हणजे आपलें तसेंच देशाचें साहजिक कल्याण होण्याचा संभव आहे. मग अर्थांत् आपले महोद्योग, परिश्रम, ऐक्यता आणि देशप्रीति, आदिकरून गुणांचा आपला कित्ता घ्यावयास अन्यत्र देश इच्छितील यांत संशय नाहीं.

पहा, तद्देशिय लोक सततोद्योगेंकरून आपल्या बुद्धि सामर्थ्यानें सर्वत्र कलाकुशलतेंत प्रवीण होत्साते यंत्रादिकांचे साधनानें प्रापंच संबंधी व व्यवहारोपयोगी हरएक पदार्थ आपल्या देशीं बनवून ते सर्व आपणा हिंदुस्थानवासी जनांस ऐते पुरवीत जाऊन तेच पदार्थ, आपण सारासार विचार न करितां निरुद्योगी होत्साता त्यांचा सुबकपणा व स्वस्तपणा इत्यादिकांवर लुब्ध हो

ऊन घेत गेल्यामुळें आपलें व देशाचें सर्वपरी नुकसान झालें व होत आहे.

आतां एकंदरीनें विचार करितां आपला अविचार व निरुद्योगीपणा यांहीं करून आपल्या देशाचें प्रतिवर्षी अविच्छिन्न ३२ कोटी रुपयांचें नुकसान होत आहे, इतकेंच नाहीं; तर हर पदार्थ तद्देशांत उत्पन्न होत गेल्यामुळें तत्संबंधी मजूरीचा फायदा बिलकुल आपल्या देशास न मिळून एतद्देशिय सर्वत्र कारखानदार व कारागीर लोकांस, उद्योग नाहींसे होऊन उपाशी मरण्याचा समय प्राप्त झाला आहे. आतां या ३२ कोटि द्रव्यांत फक्त एकटें परदेशिय कापड आपल्या देशाची १४ कोटि रुपयांची नागवण दरसाल करीत आहे. व असाच क्रम पुढें चालला असतां आपल्या लोकांचे हाल कुत्रे सुद्धां खाणार नाहींत, अशी दुरवस्था अल्प काळांत खचीत येऊन ठेपेल. असेविषयींचे विचार आज दोन अडीच वर्षांपासून कित्येक एतद्देशिय विद्वान व देशहितेच्छु लोकांचे मनांत वागून त्यांनीं पुणें, मुंबई, सोलापूर, धुळें, वगैरे ठिकाणीं वेळोवेळीं सदहू विषयावर व्याख्यानें देऊन "आपल्या देशांत उत्तम प्रकारचें कापड होत होतें, व प्रस्तुत ही आपण स्वदेशिय कापड वापरण्याचा दृढ निश्चय करून त्या कामीं सरसावलों, तर वस्त्रकार आपणास उत्तम वस्त्रें पुरवितील व तेणेंकरून आपल्या देशबांधवांस पुष्कळ आश्रय मिळून देशाचाही मोठा फायदा होईल. व असाच क्रम सर्व लोकांनीं निश्चयानें चालविला असतां देशाची १४ कोटि संपत्ति आज्जि वांचेल, म्हणजे ती मिळविली असें होईल, व तसेंच अन्य पदार्थही हळू हळू तयार करण्याकडे लक्ष पुरवावें" वगैरे

विशीं लोकांची कान उघाडी केली. त्यावरून कित्येक समंजस व देशाभिमानी लोकांचीं मनें त्या कामीं सरसावून त्यानीं स्वदेशिय कापड वापरण्याचा दृढ निश्चय केला. परंतु त्यांची संख्या एकंदर लोकसंख्येच्या मानानें "खंडी मध्यें पाव रती" या मानाची होती. तथापि त्या समयीं त्याचा कांहीं पाया सुरू झाला, हें खचीत.

आतां व्याख्यानरूपानें कथन करण्यापेक्षां कीर्तनरूपानें निरूपण केलें असतां लोकांचे अंतःकरणावर चांगला ठसा वठून ते या देशहित-सुमार्गाकडे खचीत धांव घेतील, असें मनांत आणून विद्वान व देशाभिमानी वेदशास्त्र संपन्न रा॰ रा॰ विष्णुशास्त्री पंडित मुंबई इंदुप्रकाश पत्राचे म्यानेजर आणि रा॰ रा॰ गणपतराव बाबाजी माटे सोलापूर कोर्टांतील वकील, यांनीं देशकल्याणेच्छेनें तें काम हातीं धरून सदर्हू विषयावर नव्या कविता करून माटे मजकूर यांनीं सोलापूर व पुणें प्रांतांत, तशीच पंडित यांनीं मुंबई प्रांतांत जागोजागीं वेळोवेळीं केवळ देशहित बुद्धीनें कीर्तनें केलीं, तेणेंकरून बहुतेक लोकांचीं मनें एतद्देशिय वस्त्रें वापरण्याचे मार्गीं तत्कालिक वळत जाऊन पुष्कळ लोक केवळ आज होणाऱ्या अल्पशा स्वार्थाकडे नजर न देतां देशहिताच्या मोठया कळवळयानें त्या मार्गास अनुसरले; व अशाच क्रमानें त्या कामीं तत्पर अशी लोकसंख्या अधिकाधिक जमत चालली. व लोकांस स्वदेशिय वस्त्रांचा चांगला पुरवठा होऊन वस्त्रकार लोकांस उत्तेजन येऊन योग्य साह्य मिळावें, एतदर्थ तशा लोकांपैकीं भागीदार मंडळी जमून बऱ्याच भांडवलानें स्वदेशिय कापडाचीं दुकानें पुणें, मुंबई, सोलापूर, वगैरे ठिकाणीं स्थापन केलीं.

आतां, ही सद्वार्त्ता वर्तमानपत्रद्वारां अनेक वेळां श्रवण करून माझेही मनानें मोठया देशहितबुद्ध्युत्सुकतेनें येविषयीं अनुग्रह घेतला; व धुळें येथील "ऐक्यवर्धिका" सभा मंडळीचे आज्ञे-वरून ( मी त्या सभेंतील सभासद असल्यानें ) आपल्या खा-नदेशवासी बंधुजनांस कीर्तनरूपानें स्वदेशहितोपदेश कथन करू-न आपलें काम वजवावें, असेंविषयीं मनानें उभारणी घेतली. व तत्संबंधानें पृथक् पृथक् विषय निवडून त्यांची कीर्तन-पर-सार-णीनें पद्यात्मक आख्यानें मी यथामती रचून धुळें येथें ५।६ कीर्तनें केल्यांत बहुतेक समंजस लोक देशहितकार्यार्थ कायावाचाम-नें करून झटूं लागले. व पुणें मुंबई प्रमाणेंच कांहीं भागीदार मंडळींनीं स्वदेशिय कापडाचें दुकानही चालू केलें.

गेल्या मे महिन्याचे सुटींतील झालेल्या अल्प सवडींत कांहीं हितेच्छु जनांचें पाचारण असल्यावरून संस्थान इंदूर येथें जाऊन, तसेंच मध्यंतरीं मालेगांव जि० नाशिक येथें जाऊन देशबांधव जनांस कीर्तनरूपानें हेतु प्रदर्शित केल्यावरून इंदूर-वासी व मालेगांववासी लोकांचा ग्रह देशहित समजून स्वदेशिय कापड वापरण्याविषयींचा होऊन बरेच लोकांनीं तत्काळ त्या पंथाचें अवलंबन केलें.

आतां अशा प्रकारें प्रत्येक शहरांतून व हरएक पेठेच्या मोठ-मोठ्या गांवांतून वेळोवेळीं देशहितोपदेशपर कीर्तनें होत गेलीं, तर तेथील रहिवासी जनांची मनोवृत्ति देशकल्याणार्थ स्वदेशिय वस्त्रें वापरण्याचे कामीं वळून ते त्या कार्यभागास प्रवृत्त होतील, हें निभ्रांत. मग त्यांच्या कित्याचें वळण त्यांच्या आसपासच्या लहान मोठ्या अवंतर ग्रामवासी लोकांस लागावयास काय उशीर आहे? सर्वतो मुखीं "देशहित देशकल्याण" हे शब्द ऐ-

कूं येऊं लागतील, हेंही खचीत. मग अर्थात् हरएक स्वदेशिय वस्तुही वापरण्याविशीं लोकांचा मनोनिग्रह होण्यास अवकाश न लागून हर पदार्थ स्वदेशींच उत्पन्न करण्याची योजना करून, जो तो त्या कार्यार्थ मनोभावेंकरून झटेल, हें सांगणें नको. पहा "एकानें उडी घातली कीं त्या मागें साऱ्यांची पडायचीच" अशी जी आपल्या लोकांची जगप्रसिद्ध चाल चालत आली आहे ती या अशा लोकोत्तर देशहित-कार्यांतच एकदम नाहींशी होईल, असें क्वचित.

हा हेतु मनांत आणून देशहित-संबंधानें ज्या ज्या विषयांवर कीर्तनें केलीं, असे संगतवार बांधलेले चार कथाभाग, जागजागीं देशहितेच्छु जनांस कीर्तनें करण्यास अथवा ते वाचून प्रत्येकास विचारानें त्यांतील हेतुस्थळीं जाऊन पोंचण्यास साधनभूत व्हावे, एतदर्थ त्यांचा हा लहानसा पद्यात्मक ग्रंथ छापून देशबांधवापुढें सादर करीत आहें. तर ते यांतील दोषाकडे विशेष लक्ष्य न पोंचवितां मोठया प्रेमभावानें याचा स्वीकार करतील, ही पूर्ण आशा आहे.

कवितांतून पदें कटाव वगैरेच्या अंतीं "के. स. रि." या वर्णत्रयात्मक संक्षेपी शब्द-नामानें ग्रंथकर्त्याच्या सोपनाम सर्व नांवाचा यथास्थित उपयोग केला आहे. त्याची स्पष्टता खालीं दर्शविलेल्या गीतींत केली आहे.

गीति.

॥ के–केशव, स–सदाशिव, आणि रि–रिसबूड, सर्व हें नांव
॥ करिती त्रिवर्ण के. स. रि. यास न ठेवील कोणिही नांवं[1] ॥१॥

---

१ दोष.

मध्यंतरीं फेब्रुआरी महिन्यांत एक विनंती पत्र छापवून, या पुस्तकास अगाऊ आश्रय देणाऱ्यांचीं नांवें ग्रंथारंभीं छापलीं जातील अशी शर्थ दिली होती. ती प्रमाणें आश्रयदात्यांच्या नांवनिशीची याद देणें जरी योग्य व आवश्यक होतें तथापि त्या विनंती पत्रावरून अगाऊ आपल्या सह्या देणाऱ्या बऱ्याच लोकांचें तसेंच कित्येक मित्रांचेंही मत, छापण्याविषयीं न पडल्यामुळें व आश्रयदात्यांची चारशेवर लोकसंख्या असल्यामुळें नांवनिशीनेंच ग्रंथ फुगून उगीच चर्चा न व्हावी एतदर्थ नांवें दाखल केलीं नाहींत. तत्राप पुष्कळ लोकांनीं या पुस्तकास मोठ्या प्रेमबुद्धीनें अगाऊ आश्रय दिल्यामुळें सर्वांचे कृतज्ञतापूर्वक आभार मानून ग्रंथारंभीं नावें न दिल्याबद्दल त्यांजपाशीं ग्रंथकर्ता क्षमा मागतो. आणि अगाऊ आश्रयदात्याखेरीज सर्वत्र लोक या पुस्तकमिषानें आपल्या के. स. रि. बंधुजनास आपला पूर्ण आश्रय देऊन त्याची उमेद कायम राखतील, ही आशा करितों.

हा ग्रंथ बाहेर गांवचे लोकांसही घेण्यास सुलभ पडून देशहितकार्य घडावें म्हणून याची टपाल हंशीलसुद्धां लिहिलेली एकच किंमत ठेविली आहे.

मुक्काम धुळें जिल्हा खानदेश
मिती वैशाख शुद्ध १५ शके १७९७.

ग्रंथकर्ता.
के० स० रि०

श्रीशंकर.

# कथाभाग पहिला.



या आपल्या भरतखंडाची आणि यांतील लोकांची प्राचीन काळची स्थिति; म्ह० त्यांची विद्या, ज्ञान, उद्योग, सत्ता, ऐश्वर्य इत्यादिकेंकरून देशाची भरभराटी; व त्याच देशाची व लोकांची सांप्रतची स्थिति; म्ह० वरील सर्व गोष्टींचा अभाव झाल्यामुळें देशाची झालेली दुर्दशा; आणि देशाची व आपली ऊर्जितदशा होण्याचीं साधनें; यांविषयीं.

## कीर्तनरंग कविता.

" पद—अमृतराय—अशाश्वत संग्रह कोणकरी? या धरतीवर "

या जगीं तोची पुरुष भला ॥ ध्रु० ॥

त्यजितां देहा, मागें कीर्ती राहाया झटला ॥ १ ॥ याजगीं०॥
निजजननीतें[1] सुखद्यायातें सर्वपरी जपला ॥ २ ॥ याजगीं०॥
तन मनहि धनें निज बांधवें[2]—हित साधाया खपला ॥३॥ या०॥
देशहितेच्छू के. स. रि. सांगे हेतु जनां अपला ॥४॥ याजगीं०॥

## कथाभाग.

### कटाव. [ १ ]

बांधवहो निज देश—हिता, तन मन धन
यांहिं झिजावें, मनिं उमजावें ॥ ध्रुवपद ॥

---

१ हा शब्द आई आणि भरतखंड भूमि या दोहों वाचक समजावा.
२ स्वबंधु आणि देशबांधव या अर्थी या शब्दाची योजना करावि.

याभूवरतीं,' ज्याची नग–राज ही सुकीर्ती,' ज्याच्या शिखरीं प्रत्यक्ष वसे शंकर–मूर्ती,' श्रेष्ठ अशी जी सर्वां तीर्थी,' प्रकटे ज्या-मधुनी भागिरथी,' ज्या न कधीं लय' मूर्तिमंत नग असा हिमालय,' ज्या देशाची उत्तर–सीमा आहे साची.' पश्चिमेस; सह्याद्री पर्वत,' जैं कर्वत तैं न धरून मुर्वत' कोंकण आणिक देशविभागी किनाऱ्यास अरबी सिंधू, तो' भेट इंदु बंधूची होतां,' त्या वरच्या खळमळास धूतो.' दक्षिण भागीं,' भूशिर नामें सुता[1] कुमारी,' वसे त्यावरी,' रामेश्वर ज्योतिर्लिंग भारी, स्नानास करी भागिरथीच्या,' नित्य–नेम न टळेच यापरी,' न मनीं शंका,' भूपर्यंका' वरती डंका' ऐशी लंका पुरी साजरी,' हिंदि महासागरीं वसतसे;' जीस सिंहल,' द्वीप बोलती.' ज्याच्या पूर्वेची मर्यादा,' बंगाली उपसागर साधा;' नच दे बाधा,' जाया याया मधुनि जाहजें.' गाजे ऐशीच चतुस्सीमा;' गाती ज्यास द्वीपांतरिचे लोक सभोंती;' कोंती ज्याची नसे आकृती;' द्वीपकल्प म्हणतां नच विकृती[2],' येइल चित्तीं,' ऐसी सुंदर,' भरतखंड नामेंच भूमि जे,' महीवरी सर्व या विराजे,' त्या माउलिनें जन्म दिला,' पण' आपण उतराई नच होतां,' धरिला न तियेचा अभिमान;' झालों ऐषारामीं मग्न;' म्हणुनि आपणां' कृतघ्न ऐसा डाग लागला,' धुवावया तो कलंक जनहो आतां तरि सावध व्हावें ॥ १ ॥ बांधवहो निजदेश–हिता० ॥ध्रु०॥

चोहों मुलुखांची ज्यांत[3] हवा,' हवी[4]च यास्तव वाटे सर्वां,' परवा न धरून गर्वास हरी,' सकळ लोक ज्या म्हणती बरवा,' शीत उष्ण पर्जन्य समानच,' नच संशय भू सुपीक भारी,' धान्यें सारीं,' परोपरींचीं,' अन्य कापुसादिकें पिकेंही,' पिकतीं;' त्यांची बरोबरीती,'

१ कन्याकुमारी भूशलका. २ बाधा ( दोष इत्यर्थः ) ३ ज्या हिंदुस्थान देशांत. ४ पाहिजे.

खरोखरी अन्य देश न करी,' बागबगीचीं,' हरोहरीं फलवृक्ष शोभती,' परसु आंगणीं,' घरोघरीं फुल-झाडें खुलतीं,' रानीं शेतीं,' सुआंबराई,' ग्रामा भोंतीं,' पर्वत दीर्घारण्य पहाडीं,' किरच झाडी,' दाटी वनस्पतींची मोठी,' सरोवरें नद नद्यांकरूनी,' ग्रामीं खेडोपाडीं पाणी,' उदरीं साच्या,' यत्नाच्या बहु,' रत्नांच्या त्या,' धातूंच्या हि अमोलिक खाणी,' पशु पक्षीही अनंत जाती,' मानवकृत तीं,' अवाढव्य भव्य ना वावुगी,[1]' रम्य मनोहर,' आश्चर्यकर प्रियकर सुंदर,' बहु खर्चाचीं खाशीं कामें,' इमारती पांडवकृत लेणीं,' इत्यादिक मी पृथक्पणानें,' कथितां विषयांतर होईल तें,' एका चढिहून एक शहरें;' हरे पाहतां दुःखहि,' चिंता नुरे, भूकताहनही विसरे,' त्यांमधुनी उंच भव्य ऐशीं,' रम्य हार्म्य गोपुरें मंदिरें,' ग्रामें तीं कोश अर्ध कोशीं;' अगणित सम्पतीच्या राशी;' देश निवासी,' बुद्धिबळें करूनी ज्ञानाची,' वृद्धि,' सदुद्योगें विद्येनें,' महत्पदाशीं,' चढले; मग अन्य देशवासी,' लोक,' सहाजिक दासदासित्ते,' होउनिया लागले पदांशीं,' झाले मग निर्धोक मानसीं,' ऐषारामीं होति आळशी,' हवाशीर बैसूनि महालीं,' ख्यालि खुशाली करुनि बहाली,' अश्व उडविले रंगण-चालीं;' पांघरुनी आंगावर शाली;' पुढें म्हशाली,' सदां दिवाळी,' गालीच्यावर बैसुन,' लोडा टेंकुन,' तांबूल सदां गालीं.'

(पुढें कटाव चालू.)

**श्लोक.** ( मंदारमाला )

॥ खाऊनिया मिष्ट केली तनू पुष्ट ती मानिली इष्टची कामिनी ॥
॥ न्हावी शुभांगी पलंगीं विहारी बहारींत नेल्या किती यामिनी ॥

---

१ वाइटसाईट.

॥ घेती सदां चूर्ण काढेहि सौख्यें कण्हौनी मुखीं कष्टती बोलतां॥
॥ सोसे न ज्या थोडकें ऊनही शैत्य होईच वायू जरा हालतां॥१॥

(अमृतध्वनीवृत्त.)

॥ होऊनिया प्रकृति ऐशा बहू हलक नाजूक जे न हलती ॥
॥ कोणे स्थळीं हिनच यानां*विना कधिं जयांना घडे सहल ती॥
॥ स्त्री भाषणीं मिळत थोरी म्हणोनि नच शत्रूस थोर गणती ॥
॥ ऐशा रितीं स्वकिय साम्राज्य लौकिकाहि जातां कुदैव म्हणती. ॥२॥

(विबुधप्रियावृत्त.)

॥ पांचशां तहिशूर एक नुरे प्रसंगिं धजावया ॥
॥ व्यापिली तनु आळसें विषयींच सौख्य रुचे जयां ॥
॥ तोफ बंदुक पाहतां अति जीव आकुल तो करी ॥
॥ सूटतां मग बार काय कथूं ? न देह हि सांवरी. ॥ ३ ॥

(कटाव चालू.)

ढाली तरवारीहि बंदुका,' भरून संदुका,' पडल्या त्या अडगळि-च्या सांदीं' मग भोंतालीं' शत्रूचे हल्ले पडतां, तें' किल्ले देश समग्र हवालीं' करिती; लावुन हात कपाळीं' बसले स्वस्थ. तयांचा वाली' देव कसा मग होइल? झाली' धूळ जनांची बहु या परिची आझुन तरि सावध व्हावें ॥ २ ॥ बांधव हो निजदेश–हिता० ॥ ध्रु० ॥

असला जो हा देश आपला,' प्राचिन कालापासून भला' कलाकुशलतीं कलथी देउनि' इतरां सतरांशें देशांला' प्रत्येकीं उद्योगीं पहिला' महिला तेणें भूषित झाला' कारागिरिचीं उंची वस्त्रें, पात्रें, शस्त्रें,' यांहीं चौ देशांत गाजला' कोठें काय पदार्थ मासला' होय सिद्ध, हें सार्थ सांगतां' व्यर्थ पावतिल' मद्बांधवजन हे त्रासाला' या

१. हिंदु लोक. * वाहनावाचून.

समयाला' उक्त अशीं, तीं वस्त्रें फक्त व्यक्त करीतों.' या देशाला भूषण बहु काश्मीरी शाला,' मृदु मखमाला,' मश्रू, गालीचे, सखलादी;' आग्र्याच्या सत्रंज्या अनुपम' फरकाबादी छिटें दुला-या,' तै उत्तम मछलीपट्टणचीं नानापरिचीं' छिटें सुबक बंडयांस खुलाया;' काशीचे कद सुमृदु रेशमी;' धारा नगरीं मुकटे नामी;' ढाका बंगाल्याची मलमल' बहु विश्रामी;' ग्वाल्हेरी आंबवे सुरंगी,' बहु प्रकारीं;' पंपामहु येथील दोरवे' अति सुखकारी' चंदेरी पैठणी येवली' सांगिन बारिक खाशीं ऐशीं,' नारळि पदरी' आणि दुगोली,' पागोटीं लाहन मोठालीं;' ताठ अशा भर्जरी पैठण्या' खूप देख-ण्या शेले साधे ही जरिकांठीं;' बहु हातवटी' विणण्याची. किन-खाबी खण ते,' किनाऱ्यास जरिची वेलबुटी' अवलोकुन नवल होय पोटीं.' मंदिल सुंदरच बऱ्हाणपुरी;' बत्या ही रेशमी जांभळी; गौरवर्णशा शिशुशिर कमळीं' खुलती जणु भृंग पीत कमळीं,' खंबायाति येवली पितांबर,' घट्ट लांब रुंदहि सुंदर ते;' अमदाबादी नागपुरी ते,' महेश्वरी ते धोतरजोडे;' वापरती काय लोक थोडे!' तशीं उपरणीं सपोत बारिक,' हारिख[1] आंगावरी उन्हाळे' दिवशीं घेतां, असती न कळे,' बुटेदार किनखाब पहातां,' दिपती डोळे;' जरी[2] बुटेदार शालनामे;' मुंज विवाहांत निमेजामे[3]' होऊन, करिती मंगल कामें,' उत्तम लुगडीं आणि पातळें; नारायणपेठि निरनि-राळे,' सुबक तऱ्हांचीं,' शृंगारी तसिं' भिंगारी कितिकां रंगांचीं,' मृदुअंगाचीं,[4] नगरी तैसीं उत्तम लुगडीं;' सातारी रेशमी दाल ती,' बनातिच्या टोपीच्या भोंतीं,' भारी खुलती;' करनाटाकि आणिक सोलापुरि,' रुमाल साधे जरी किनारी;' तैशा सर्वोत्कृष्ट घोंगडया,' खऱ्या सौंगडया,' गरिब जनांच्या,' कुळकुळीत काळ्या

१ हर्ष. २ जरतारी. ३ झगे, पायघोळ आंगरखे. ४ पोताचीं.

जणुकाजळ; सोज्वळ तैशा, मारवाडच्या शुभ्र धावळ्या; खानदेशचे तसे वराडी लांब रुंद ते सपोत जाडी, झोरे हि पलंगाच्या खाशा, गंगाजमनी, सफेद काळ्या, सुती नवारी; ऐशा वस्त्रांच्या प्रति सगळ्या, वेगवेगळ्या, कथितां, विस्तार फार होइल, यास्तव करितों पुरें. परंतू, ज्याच्या पूर्ण कृपेची अवधी, ही लाभे आपणां देणगी, तिला वावगी, समजुनि चित्तीं, जगदात्या प्रति फुका विसरलों, यास्तव सर्व हि सुखा घसरलों, इह पर लोक–सुसाधन साधा; निद्रिस्थन स्वस्थ रहावें ॥ ३ ॥ बांधव० ॥

वस्त्रें दर्शविल्यापरि सदरीं, सुती, लोंकरी, साधीं ही भर्जरी, रेशमी, भारी नामीं, हा मी हामी भरून सांगतों, हिंदुस्थानांतिल हा कापडरूप भूपती भारी तापड; अन्य देशच्या समस्त वस्त्ररूप नृपाळां मारी थापड, तेणें झांपड येउन त्यांतें निचेष्ट पडती. असा प्रतापी राय हा बघा, मुलुख आवघा, पृथ्वीवरचा घ्यायालागी करी तयारी प्रथम भोंवतालच्याच देशीं करुनि स्वारी, जिंकुन त्यांतें बाहुबळें, मग होय पुढारी, वर्चस्वानें सरसावें मग युरोप खंडीं अधीं ग्रीस देशाला धुंडी; खंडित करुन तयास अखंडित, आत्मवैभवा करी सुमंडित. सरे पुढें दुसरे देशांप्रति, बसवी त्यां घालुन मुरकुंडी. थंडी ऐकुनि उत्तरेस बहु, जाया तिकडे, अटलांटिक सागरीं प्रचंडीं, मारुनि मुरकांडी, ओलांडी. इंग्लिश खाडी, ग्रेट ब्रिटन देशाच्या सुंथडीं मुसांडि देउन वरती येतां, तत्तेजानें, दिपले तेथिल जे पाखांडी[2] तोंडातोंडीं वैभव परिसुनि, लोकांच्या झुंडीच्या झुंडी येउनि, मुंडी लववुनि खालीं मिरवित नेती स्वकीय नगरीं; घरीं नेउनी स्वागत आगत करी जन प्रत्येक उदारीं; नृप–दरबारीं मान मान्यता देउनि

१ खात्री. २ उगीच आपली शेखी मिरविणारीं नागादिकांचीं वस्त्रें.

भारी,' प्रजा अम्ही आपलीचसारी,' आपण अधिकारी अम्हांवारी,' असें मान्य केलेंच सत्वरीं.' तपें लोटलीं किती यापरी.' त्याउपरी कित्येक मत्सरी' लोकां हेवा उपजुनि भारी,' वाढुनि वैशम्य हें अंतरीं,' गोष्ट न ती वाटे त्यांस बरी,' म्हणती, याची वरचढ ऐसी,' अपल्या देशीं सतत राहिल्या,' खंडणिच्या जातिल धनराशी,' पुढें उपाशी' मरावयाची' पाळी येइल अपणां खाशी,' करितां आपण, देशहितार्थां' कृपण न होऊनि,' एकाएकीं' करूनि एकी,' केला जरि पर्ण,[1]' कीं हिंदुस्थानांतिल वस्त्रें' नच वापरितां' तेथिल आणिक अमेरिकेचा' कापुस आणुनि निज देशातें,' सततोद्योगें श्रम करुनि बहू' आपण हातीं,' जाडीं अथवा बारिक जैशीं' निघतील तशीं काढुनि वस्त्रें' ल्यावीं. यांत न होऊनि हानी' राहील नफा देश-दुकानीं.' या कृत संकल्पें लोकांनीं, कानीं आप्त इष्ट मित्रांचे' हितगुज सांगुनि' करुनि विनवणी' हळू हळू तन्मना वळविलें;' करुनि धडा[2] मग सर्वां मिळुनी' अर्ज करूनी' वृत्त पार्लमेन्ट सभेप्रति तें' सर्व कळविलें.' तेथें होउनि विचार याचा' पटली गोष्ट मनीं साचार' सर्वांनुमतें निर्णय ठरुनी' वाजे नृप-चौघडा[3] धडाडा' कीं, जो ब्रिटिश हिंदु-वस्त्रांचा' व्यापार करील, तया[4] अथवा' वापरील कोणी, मग जरि तो' अखंड धनवंत पुंड अथवा जरि हि उदंडच' स्वेच्छाचारी असा हिंडतो दंड दोनशें[5] पौंड तयाला' होइल, हें न टळेल कदा ही' ऐसी द्रोही[6]' सन सत्राशें साली फिरतां' मग तो कांहीं' उपाय नाहींसा होऊनी,' मान्य नृपाज्ञा' लोकां करणें भाग जहाली.' देश हितेच्छू के॰ स॰ रि॰ सांगे——हें ऐकुन सावध व्हावें ॥ ४ ॥ बांधव हो निज-हिता॰ ॥ ध्रु॰ ॥

१ निश्चय. २ निग्रह. ३ कायदा प्रसिद्ध झाला. ४ त्या वस्त्रातें. ५ दोन हजार रुपये. ६ राजाज्ञा ( शपथ. )

## साख्या.

॥ पूर्वीं पासुनि देश आपला महिवरि सर्व विराजे, ॥
॥ यास्तव त्याप्रत घ्याया झटले देशदेशचे राजे. ॥ १ ॥
॥ तार्तरि, अफगानी, यवनांनीं करुनीच विचाराशीं. ॥
॥ स्वाऱ्या केल्या, देशीं नेल्या सम्पत्तीच्या राशी[१] ॥ २ ॥
॥ बाहु-बळें शेवटिं ते झाले स्वामी या देशाचे. ॥
॥ हिंदू लोकां परतंत्रपणें मग सुख होय कशाचें? ॥ ३ ॥

## श्लोक.

### (शिखरिणीवृत्त)

॥ जरी हिंदुस्थानावरति यवनादी अधिपती ॥
॥ बहू वर्षें होते स्वजन तरि चित्तीं न दिपती[२] ॥
॥ कला नाना विद्या-कुशल गुणसंपन्न सकलां. ॥
॥ जनीं, या देशाचा फिरुन गत पैसा हिसकला ॥ ४ ॥

### (स्रग्धरावृत्त.)

। रूचीं[*] हीं रेशमाचीं नरम, गरम तीं लोंकरी दिव्य वस्त्रें; ॥
॥ पात्रें धात्वादिकांचीं सुबक, किति तशीं तीव्र अस्त्रादि[३] शस्त्रें; ॥
॥ प्रापंचाचे सुखाचे वरकड सगळे सान[४] मोठे पदार्थ; ॥
॥ घालोनी कारखाने, स्वकरिं जन करूं लागले संपदार्थ. ॥ ५ ॥
॥ जागोजागींहुनी तीं[५] भरुनि गलबतें वारि-मार्गें, तसाच ॥
॥ गाड्यांघोड्यांहि उंटां वरुनि भरुनि तो[५] खुष्कि-मार्गींहि साच, ॥
॥ दूरीं अन्य प्रदेशीं बहुविध[६] बहुधा धाडितां चोख माल, ॥
॥ मोलें श्रीमंत घेती; नवल किति? झटे घ्यावया जो हमाल. ॥ ६ ॥

१ ढीगचे ढीग. २ भ्याले नाहींत. ३ तलवारी आदिकरून. ४ लहान. ५ दर्शक सर्वनाम माल शब्दाचें. ६ नाना प्रकारचा. * कापुसाचीं.

## आर्या.

॥ जातांच लोक घेती चढावढीं[1] सर्व माल हारोसीं,[2] ॥
॥ येती सम्पत्तीच्या निजदेशीं त्यामुळें परत राशी. ॥ १ ॥
॥ यापरिच उलाढाली बहु करितां द्रव्य देशचे देशीं ॥
॥ राहे यद्यपि लुटिती यवनादि लुटारु खूप नृपवेशी.[3] ॥ २ ॥
॥ यास्तव या देशाची रीति, स्थिति, गति, तसेंच ऐश्वर्य, ॥
॥ हा काल टिकुनि राहे; साप्रंत परि गत बरी न तात्पर्य ॥३॥

## पद (२)

"हर हर सांपडलों—या चालीवर"

नवरी गति आतां, गति आतां, कौतुक काय पाहतां ॥ धृ० ॥
॥ अन्योद्योगाची, ती नौकरि वांचुनि न उरे वार्ता ॥१॥ नवरी०॥
॥ श्रम करुनी रात्रंदिन निर्वाहाची कायम चिंता ॥२॥ नवरी०॥
॥ बहु पाहतां पाहतां देशा आली हो निर्धनता ॥ ३ ॥ नवरी०॥
॥ व्यापारादिक धंदे बुडले कांहीं नुरलें हातां ॥ ४ ॥ नवरी० ॥
॥ देशहितेच्छू सांगे. के. स. रि., केंसाचि उरले माथां ॥५॥ नवरी०॥

## श्लोक.

( मालिनी वृत्त. )

॥ प्रथम करुनि विद्या—वृद्धि विद्वान व्हाया, ॥
॥ इतर सकल धंदे वाटले तुच्छ, वाया. ॥
॥ मिळविति जन तेव्हां[4] मोठ मोठीं हि कामें; ॥
॥ हंशिल उगिंच कोणी राहिले ना रिकामे. ॥७ ॥

---

१ चढा ओढीनें. २ खानदेशी शब्द अर्थ लिलावांत. ३ राजवेषधारी. ४ या राज्यारंभीं. * अचल इंग्रजींत.

॥ परि सकलहि अन्योद्योग धंदे सहाजीं ॥
॥ बुडुनि, जन कराया लागले हांजि हांजी. ॥
॥ उठुनि उदिम. धंदे अन्य देशांत जाती. ॥
॥ आझुनि तरि पहातां मित्र हो कां मजा ती !! ॥ ८ ॥
॥ प्रथम वजन लोकां म्याट्रि[1]क्यूलेटडांस, ॥
॥ मिळविति दरमाहा साठ मुद्रा धनास. ॥
॥ प्र[2]कृत तरि कथूं तद्दुर्दशा ती कशाला ? ॥
॥ नपुसति नृप बीएँ[3]., एम एँ[4]. ही अशाला ॥ ९ ॥

## दिंड्या.

॥ खपुनि इंग्लिश विद्येस सतत बाळें ॥
॥ कारिति साध्य अश्रू करूनिया डोळे. ॥
॥ परीत्यांसी तें प्राप्त फळ न कांहीं. ॥
॥ वघूं कारण, जाहली दशा कां ही? ॥ १ ॥
॥ नृपाळाश्रित नौकरी विना लोकां ॥
॥ कुठें सांप्रत थारा न; हें विलोका. ॥
॥ पहा अगणित विद्वान मोठमोठे ॥
॥ फिरति चौदेशीं भरावया पोटें ॥ २ ॥

## पद ( ३ )

हर हर सांपडलों सांपडलों या०

॥ सोडा ह्या छंदा, या छंदा इतरां धंद्या वं*दा. ॥ ध्रु० ॥
॥ उत्तम शेती, मध्यम व्यापार, नीच नौकरी धंदा. ॥ १ ॥ सो० ॥
॥ जें होय जाय, परि यापुढतीं दूर करा परबंदा ॥ २ ॥ सोडा०

---

१ इंग्रजी पाठशाळेंतील पहिल्या परीक्षेंत पसार झालेल्या विद्यार्थी लोकांस. २ सांप्रत कालीं. ३, ४ पाठशाळा तिसऱ्या चौथ्या परीक्षेंत पसार झालेले लोक. * स्वीकारा.

॥ घाला हात तयाला[1] मनिं आठवुनी बालमुकुंदा ॥ ३ ॥ सोडा०
॥ कुल–लौकिक घालविला, यापरि लोक करोताचि निंदा ॥४॥ सो० ॥
॥ नौकरि होउनि घरची तेणें पावाल महानंदा ॥ ५ ॥ सोडा० ॥
॥ के० स० रि० वदे, फळातें देईल सर्वां जो पोशिंदा[2] ॥६॥ सोडा०

## आर्या.

॥ बांधव हो गेलेल्या याँ[3] शालीवाहनार्ध शतकांत ॥
॥ व्यापारा संबंधें पाहूं निज देशची कशी मात? ॥४॥
॥ चट लोकां चट[4] लागुनि बहु विद्येचीहि नौकरीची ती ॥
॥ त्यांतच गुंतुनि जो तो, मी मोठा शाहणा म्हणे चित्तीं ॥५॥
॥ जाती पर द्विपीं मग सर्व व्यापार कारखाने, ते ॥
॥ झाले या देशांतिल कोट्यावधि धन हिरावुनी नेते[5] ॥६॥

## पद. ( राग कालिंगडा. )

( धनी सकल तरणी कुलज नृपति मुगुटमणि या चालीवर. )

पहा देश उसापरी पिळुनि जाय कसा!! ॥ ध्रु० ॥
॥ अन्य देशवाशि सर्व महोद्योग हेंच पर्व[6] कल्पुनि धन अब्ज खर्व संकल्पित नेति दिसाँ[7] हो ॥ पहा ॥ १ ॥ बुद्धिबळें कितिक कळा निर्मूनि जनांस ळळा लावूनि हि मोहविळा, कांपिति नच कळुनि खिसा[8] हो ॥ २ ॥ पहा० ॥ यंत्रबळें बहु समर्थ होऊनिच हर पदार्थ काढुनि, दाबूनि शर्थ घेती हिसकूनि कसा हो ॥ ३ ॥ पहा० ॥

---

१ ज्यास जो साधेल त्या धंद्यास. २ पोसणारा. ( ईश्वर इत्यर्थः ) ३ शके १७५० यापुढें आज १७९६ पर्यंत. ४ गोडी, व्यसन, रुचि. ५ नेते झाले. ६ पर्वणी. ७ दिवसा. ८ रुपये मोहरा भरलेली कंबरेची लांब पिशवी. ०–० विद्येची अभिरुचि लागणें हें सद्भाग्य; परंतु केवळ नौकरी करितांच विद्या शिकण्याची इच्छा धरून ती थोडी अवगत होतांच नौकर होणें असा अर्थ.

सोडुनिया द्वैते[१] गर्व देश हिता स्मरुनि पूर्व झटा, मागतो अपूर्व[२] के० स० रि० हा पसरूनि पसाहो ॥ ४ ॥ पहा० ॥

## आर्या.

॥ मागूनि करित आले धंदा जो, वाडवाडिल तोच पुढें ॥
॥ पुत्रहि पौत्रीं तैसा करण्याची रीत आपणांत पडे ॥ ७ ॥
॥ यास्तव कला, कुशलता, नच वाढुनि सर्व जाहल्या रहित ॥
॥ तेणें निज देशाचें, सर्वस्वी आपुलेंहि हो[३] अहित. ॥ ८ ॥
॥ अवलोका, श्रेष्टत्वा हर इुभ्रेरंच अन्य[४] लोक खरे ॥
॥ चढले. तिकडिल आर्यस[५] देखिल उतरील आपुले नखरे ॥९॥

## श्लोक.

वसंततिलक वृत्त.

॥ सोनार, शिंपि हि वणिक्जन, कारकून, ॥
॥ लोहार, शेतिक, सुतार, अदीकरून ॥
॥ श्रीमान वा जन गरीब असो उदंड[१०], ॥
॥ लोखंड त्यावरति बैसवि आत्म खंड. ॥ १० ॥

(शार्दुल विक्रीडित वृत्त.)

॥ ऐका ऐरण, चाकु, कातर, सुई, हातोडि ही कानस, ॥
॥ फाळांदी अउतें, हि कर्वत, पटाशी, किंकरें, वांकस, ॥
॥ कोंडा, किल्लि, कडी, कुलूप हि खिळा, स्क्रू, चूक, नाना रुपा ॥
॥ घेऊनी, करितें बहू इकडचा लोखंड पैसा सपा. ॥ ११ ॥

---

१ अपसांतील वैर, मच्छरभाव. २ नविन, विशेष ३ झालें. ४ परद्वीपस्थ. ५ विलायति. ६ लोखंड. ७ घमेंडी. ८ खेलकरी. ९ अथवा. १० मोठा.

(उमा वृत्त.)

॥ कागद, शाइ, सुरा, क्लिपेन, शिलेट हि पेनसली[1], रबर, ॥
॥ वॉच, घड्याळ हि बूट सुछत्र[2] शिरीं कर बैसावितीं जबर. ॥
॥ साबण, मेणबती, मुनलाइट, शेडँ, बिलोर, दऊत, तशा ॥
॥ टामटुमाहि कितीक, बुचाडुनि नेति धना, करुनी कुदशा. ॥१२॥
॥ ह्मयाटिन, स्याटिन तो मरिना, सुबनात तसे पदं[4] ही कर[4] मोजे॥
॥ मलमल, हारक, नाइनक्लाकहि सैनं[5] तशी जग—मांय त्रिराजे ॥
॥ चादरपाट बहूविध छीट रुमाल हि टोपि अनंत पसारा. ॥
॥ कापड हें फडकावुनिया धडका लुटिलें अडकों[7] चट सारा. ॥१३॥

(द्रुतविलंबित वृत्त.)

॥ परि विलोकन लोक न ह्याकडे ॥
॥ करुनि, मानिति मानसिं फांकडें. ॥
॥ जन जरी नजरीं पशु—हाँडको ॥
॥ बघति, त्या बहु वेंचुनि आडका ॥ १४ ॥
॥ निजधना सदनांतुनि घालवी, ॥
॥ न समजे पण आपण[9] हाँल[10] वी[11]. ॥
॥ न शिलकीं हलकीं घरिं घोंगडी, ॥
॥ डउल खूप परंतु करी गडी. ॥ १५ ॥

## कटाव २.

सांप्रतचा श्रीमंतिडौलतो,' साच बोलतों.' पाहुन आत्मा त्यास डोलतो.' वेष्टुनिया सगळाच गळा' अशि बारबंदि आंगामधिं पघळा, जाकेट वरी;' त्यावरि स्याटीनीचा कब्जा;' उपरी काळा' एक बहु-

१ दगडी आणि लक्कडी. २ छत्रि. ३ वॉलशेड. ४ पाय आणि हातमोजे. ५ माजरपाट. ६ जगंनाथी. ७ पैसा. ८ चाकूच्या मुठी, कंगवे, चमचे इत्यादिकांचें मूळ द्रव्य आस्थि आहेत त्यांस. ९ प्रत्येक मनुष्य. १० दुखस्था. ११ प्रसवतो, निर्माण करितो.

ढिला' जाड असातो' बनातिचा कोट, ज्यास असती' गुंड्या शृंगी शुभ्र रंगित्या' चार पांच कप्पेच तयासीं'; ज्या' न' लोंबिचा अटकाव, असा' पटका एक शिरीं फटकारुनि' झोंक तयाचा पुढें थोडका' बळें ठेविती;' मागिल भागीं' अखुड शेंडिच्या झिंज्या उडती; नीट नेटक्या करायास त्या' घटका घटका करिं सांवरिती;' मानेचा मारुनि बहु झटका,' हाव भाव लटका अति दाउनि' दाखविती अभिमान जनां तें;' धोतर जोडे टाकुन, ढुंगा' लुंगा पंच्या गुंडाळु नि, त्यावरुन' पाटलोन ढिली; पायीं' चढविति अति शुभ्र पायमोजे' रबरी गार्टर वेष्टिति मौजें' वरुन घट्ट तो' रबरिबूट तो' चढवुन घाई घाई चालतां' कर्र कर्र वाजेच खालता;' जरि हि वांकडी', तरी फांकडी' मानुन,' हातांत एक कांठी; वर्तुळाकृती' फिरवायाची फार हतवटी; वामहस्तकीं' बहु स्वस्तकीं' एक रुमाल कमाल हातभर; त्यानें वारंवार पुसावें' मुख, मगतें मुख काय पुसावें!!' पुनः पुन्हां मग' तें फडकें कप्यांत विसावें' त्या बाहात्तर गुणीं देवमण' अश्वा–कंठीं जैसा भूषण,' सर्व हि या पोषागीं तैसें' त्या पुरुषाला' कंठांत कंठ–भूषण साजे.' गोफाकृति एक लांब, जाडी,' जीस मुलामा कामा पुरता,' सोनेरी ऐसीच सांकळी' गळीं मोकळी उपवीति रितीं' लोंबे कोटावरुनि खालीं' तळीं पदकरूप तें चुनाळी' घड्याळ, अडक्या कप्यांत बसे.' असे गडी ते कितीक चैनीं', मनीं धन्य आपणां मानिती.' हे लोक, जसे' गळ्यांत सैली पुंगी घालुनि' झाले हो नानकशा पंथी,' असे भासती' किती यापरी श्रीमंति रिती' वर्णू तरि ती?' अतां विनंती,' राहो प्रीती.' न चिसि व्हा क्रुद्ध बंधु जन या केसरिच्या बोलाकरितां ॥ १ ॥ खर्चुनिया व्यर्थ० ॥ ध्रु० ॥ ८९ ॥

---

१ हातानीं.

श्लोक. (विबुधप्रिया.)

॥ सर्व बत्तिस कोटिचा परिसा[१] विलायति माल हो ॥
॥ येतसे निज देशिं या दर साल, फार कमाल हो[२]. ॥
॥ त्यांत कापड एकटेंच धना चतुर्दश कोटिला ॥
॥ नेतसे हिसकावुनी; निजदेश सर्व हि आटला. ॥ १६ ॥
॥ होय हा परदेशि —कापड—रूप रोग जलोदर, ॥
॥ त्याविशीं सदुपाय हो करणें अवश्य अगोदर. ॥
॥ रोग तो लय पावतांच तदंगभूत अवंतर ॥
॥ व्याधि, ज्या कफ, खोंकला, दम, दूर होतिल नंतर ॥१७॥

(शार्दुल० वृत्त.)

॥ सत्ता कांहिं नुरे, स्वराज्यहि नुरे, जायास थारा नुरे, ॥
॥ कोठें त्राण नुरे, घरीं धन नुरे, व्यापार धंदा नुरे, ॥
॥ राह्या ठाव नुरे, सदाश्रम नुरे, सद्धर्म—भीती नुरे, ॥
॥ लोकीं ऐक्य नुरे, जनीं सुख नुरे, स्वातंत्र्य तें ही नुरे ॥१८॥

साक्या.

॥ वस्त्रांचें मूळ बीज कापुस, ईश—कृपें निज देशीं ॥
॥ पिकतो पुष्कळ; यास्तव तुमचा मित्र तुम्हा उपदेशी. ॥४॥
॥ आज्ञुनि डोळे झांक तुम्ही कां करितां? मज न कळे कीं. ॥
॥ देश हितार्थी इंग्लंडासम प्रथम कराहो एकी. ॥ ५ ॥
॥ द्वीपांतरिचीं नच वापरितां वस्त्रें टामटुमीचीं ॥
॥ त्यांवीं[३] निज देशचीं स्वकष्टें, हें न कथावें म्यांची. ॥ ६ ॥
॥ त्यायोगें निज देश बांधवां निघूनि पुष्कळ कामें ॥
॥ तुम्हास देतिल दुवा, क्षुधित जे बसले रडत रिकामे ॥ ७ ॥

---

१ एका. २ होति. ३ वापरावीं.

॥ याहुनि ही हित निज देशाचें होइल, राहिल सारी ॥
॥ चौदा कोटी निज संपत्ती, नच जातां बाहेरी. ॥ ८ ॥

## श्लोक.

( वसंत तिलकवृत्त.

॥ हें आज कापड पडेल महाग थोडें ॥
॥ तेणें स्वदेश–हित फार परंतु जोडे. ॥
॥ ना अन्य देश धन तें[1] शकणार नेऊं; ॥
॥ वस्त्रें शिवाय बहु येथिल हो टिकाऊ. ॥ ॥१९॥
॥ व्यापार पूर्ववत सर्वहि कारखाने ॥
॥ चालूनि, लोक झटतील तयां सुखानें. ॥
॥ थोड्या दिशीं मग स्वदेशगृहांत नामी ॥
॥ वस्त्रें निघून, मिळतीलहि अल्पदामीं ॥ २० ॥

## आर्या.

॥ प्रत्येकीं या कामीं दृढ निश्चय पाहिजेच झट केला, ॥
॥ मी वापरीन हिंदूवस्त्रें[2]; ही शपथ याच घटकेला ॥ १० ॥
॥ अथवा स्वजातिविषयीं पूर्ण असे आपणांस अधिकार; ॥
॥ मग राज–बल हि सत्ता, नलगे बंदूक, ढाल, तलवार. ॥११॥
॥ ज्ञातींत[3], सर्व लोकीं ना करितां आज ही उद्यां परवां ॥
॥ ठरवावा निर्णय[4] हो. कोणाची ही धरूनि ना परवा. ॥ १२ ॥
॥ निज देशचींच वस्त्रें ल्यावीं; व्यतिरिक्त यां जरी कोणी ॥
॥ जन वापरील, त्याची वदणें लोकीं सदैव गाऱ्हाणीं ॥ १३ ॥
॥ निश्चय असाचि करितां सर्वांनीं आप आपल्या ज्ञातीं ॥
॥ मग होइल कोणाची प्राज्ञा मोडावयास आज्ञा ती? ॥ १४ ॥

---

१ चौदा कोटि. २ हिंदुस्थानांत तयार झालेलीं. ३ आपआपल्या जातींत. ४ नेम.

॥ सहजच इच्छित येइल त्यायोगें कार्य-भाग हातांत. ॥
॥ मग काय विपट[1] पाडिल!! आल्याही शकुनिचा महातात ॥१५॥

## पद ५.

"राग सोरट. कांहीं बोला महाराज० या चालीवर"

जनां हिच प्रार्थना, त्वरित करूनी एकी, धरणें स्वदेशाभिमाना.
॥ ध्रु० ॥

॥ घ्याया उद्योग-शस्त्र हातीं शीघ्र उठाच; मजा हो ॥
॥ काय पहातां!! दारिद्र्यरिपू खुडितो निज मानां[3]. ॥१॥ जनां०॥
॥ देशाच्यां[4] संबंधें आपण, सागर कूप तसे हो; ॥
॥ परंतु कूपोदक लाजवितें सिंधूसहि; मानां ॥ २ ॥ जनां० ॥
॥ स्वदेशीय वस्त्रें या पुढतीं खचित वापरूं, ऐसें ॥
॥ येक्षणिं देउनि वचन राखणें के. स. रि. च्या मानां[6] ॥३॥ जनां०॥



१ बुद्धीस फरक. २ शकुनिमामाचा आजाहि. ३ गळे. ४ देशांतील एकंदर २० कोटि लोक-संख्येच्या मानानें. ५ समजा. ६ सन्मानास.

श्रीशंकर.

# कथाभाग दुसरा.

" देशाच्या संपत्तीचा ऱ्हास होण्याचीं कारणें, व संपत्ती वृद्धिंगत करण्याचे उपाय; यांविषयीं. "

## पद. पूर्वरंग.

(अशाश्वत संग्रह कोण करी? या चालीवर.)

जन हो करणें हा विचार. ॥ ध्रु० ॥
॥ होतें कैसें? झालें कैसें? होणारहि साचार? ॥ १ ॥
॥ दुर्द्धर आळस रिपु, स[1]बल कसा होईल हद्दीपार? ॥२ ॥
॥ अज्ञानत्वें परदारारत झालों; यांत न सार. ॥ ३ ॥
॥ सर्व स्वाकिय असूनि हि परकें झालें; न उरे थार. ॥ ४ ॥
॥ साधाया आत्महित कथितसे के० स० रि० वारंवार. ॥५॥

# कथाभाग कविता.

## श्लोक.

(शार्दूल विक्रीडित वृत्त.)

॥ श्रोते हो परिसा, कलाकुशलता—विद्या गुणीं आपुलें ॥
॥ मागें पाउल उत्तरोत्तर पडे, तेणें न होतां भलें ॥
॥ देशा निर्धनता तसी निजजनां ती प्राप्त झाली. अहा!! ॥
॥ लोकांच्या स्थिति, रीति, भाति, कथितों; ज्या नाशकारी महा ॥१॥

---

१ ससैन्य. म्ह० सुस्ती, निद्रा, जांभया इत्यादिकांसहवर्तमान.

[ वसंततिलकावृ० ]

॥ निर्वाह होउनिच जें शिलकेस साचें,
॥ तें द्रव्य काय करिती तरि लोक साचे ॥
॥ याचा विचार करितां मज आढळें कीं, ॥
॥ दोहों स्थितींत परिणाम घडे स्वलोकीं ॥ २ ॥
॥ ज्याची असेल धनऐपत, त्याप्रमाणें ॥
॥ पाठीस लागुनि घरांतु[1]नि नित्य गाणें ॥
॥ घ्याया झटे कनक, तो घडवी नगांतें; ॥
॥ [2]ज्यांपासुनी न उपयोग घडे जगातें ॥ ३ ॥

( चामरवृ० )

॥ वर्ष एकस[3]ष्टपासुनीच सत्तरावरी ॥
॥ दाह सालचें धरूनि, काढितां सरासरी[4] ॥
॥ पंधरा सुकोटिचें सुवर्ण आणखी रुपें ॥
॥ अन्य देशिहून ये, स्वदेशिं सर्व तें खपे ॥ ॥ ४ ॥
॥ व्हावयास त्यांतुनी निमें सुराजमुद्रिका ॥
॥ टां[5]कसाळ पाहतें; परंतु शेष तें फुका ॥
॥ आठ कोटिचें स[6]रासरी रुपें सुवर्णहो ॥
॥ डागिण्यांत वेंचतें; तरी न[0] आस[7] पूर्ण हो[0] ॥ ५ ॥

## दिंड्या.

॥ अल्पविद्यीं जाहले लोक मानी[8] ॥
॥ पहा, कोणी कोणास ना जुमानी. ॥

---

१ स्त्रीचें. २ सुवर्णापासून. ३ इ० सन १८६१ पासून. ४ हिस्सेरसी. ५ नाणें, पाडण्यास सरकार विकत घेतें. ६ सुमारें. ७ आशा. ०-० होत नाहीं. ८ गर्विष्ठ.

॥ वाडवडिलां अज्ञान बोलती कीं ॥
॥ घरीं दारीं मिरविती आत्म शेखी ॥ १ ॥
॥ कशी सांप्रत होय हो लोक-रीती ?
॥ थोर लाहन मिळतांच नौकरी ती ॥
॥ नुरे परवा[1] मग बांधवादिकांची ॥
॥ गमे ललना खाण केवळ सुखाची ॥ २ ॥
॥ सवें घेउनि जाय तों[2] अंगनेस ॥
॥ म्हणे, लुगडें हें गडे नवें नेस ॥
॥ अतां अवधीं दे थोडक्या दिसांची, ॥
॥ करिन फिरकीचें फूल, मूद साची. ॥ ३ ॥

(विबुधप्रियावृत.)

॥ मूद, शाखडि, नाग, केतक, केवडा, फिरकी—फुलें, ॥
॥ ताइताळ, सरी, चितांग, ठुशी, गळेसर, गांठलें, ॥
॥ बोर, मोहर, होन ही, पुतळ्या, जवादिक मालिका[3], ॥
॥ चन्द्रहार सुकंठिं तो, कटिबंद[4] कंबरिं, आयका. ॥ ६ ॥
॥ बाजुबंदहि वांकि, कांकण, पाटल्या, बहु बांगड्या,
॥ तोडिये,[5] गजरेहि, गोठ, सुमुद्रिकांगुलि—सौंगड्या ॥
॥ कंठि, गोफ, मुद्याहि, जोडवें, पोंचि, सिंहमुखी कडें, ॥
॥ गेंद, जोडवि, सांकळ्या, कथिलेच हे नग[९] रोकडे[६]. ॥ ७ ॥
॥ चांदिचीं किति थोर लाहन भाजनें परियांच तीं ॥
॥ सांच लोक करावया धन आपुलें बहु वेंचिती. ॥
॥ रौप्य कांचन धातु—संग्रह—वैभवें जन डोलती. ॥
॥ पाहतो मग कोण हो निज देशच्या क्षय दौलतीं? ॥ ८ ॥

---

१ गरज, तमा. २ प्रत्येक उमेद्वार. ३ बोरादिकादि करून माळा. ४ कंबरपट्टा. ५ तोडे. ६ ठोकळ, निव्वळ सोन्या चांदीचे. ७ पात्रें. ८ याच प्रकारें करून. ९ डागिने.

( पृथ्वि वृत्त. )

॥ परीं* सदनिं जाय हें स्वधन आठ कोटी, अशी ॥
॥ स्वदेशिय जनां नये कधिंहि कल्पना मानसीं. ॥
॥ म्हणेल जरि कोणी, ये[1] रजतें[2] हेम त्या ऐवजीं[3] ॥
॥ कसें मगत्तरी असे अहित देशच्या ऐवजीं[4]? ॥ ९ ॥

## पद. २

" बायकाय घालिशीं संसृतिचा पिंगा; या लावणीच्या चालिवर "

॥ बहु सुखकर, हितकर, रजतकांचनांस[5] ॥
॥ मानूनि करितसा कां निज धन-नाश? ॥ ध्रु० ॥
॥ धातु या बहुरुपी, नटुनि वेष सत्रा ॥
॥ घालिती मोह आपणांस सर्वत्रां ॥
॥ शिर—कमल, कंठ, कर, पदादितनु—गात्रां ॥
॥ बहु करुनि सुशोभित, सुख देती नेत्रां. ॥
॥ त्या स्वयें झिजुनि होती पातळ पत्रा; ॥
॥ परि न कळे त्यांच्या कपट रूप तंत्रा. ॥

[ चाल. ]

॥ लावूनि लळा आपणांस त्या भारी ॥
॥ संपत्ति आपुली हिसकाविति सारी. ॥
॥ ठक अशा; बहुत तैशाच अनुपकारी. ॥
॥ सोडुनी प्रसंगीं जाती पर दारीं; ॥

---

१ येतं. २ रूपें. ३ बद्दल. ४ द्रव्यसंचयांत. ५ चांदी आणि सोनें यांस. * अन्य द्वीपांत.

[ चाल प्रथम. ]

॥ करितीच धन्याचें जनांमधें हांसें; ॥
॥ के० स० री० म्हणुनि तोडितसे तत्पाश. ॥ १ ॥
॥ बहु सुखकर हितकर० ॥ ध्रु० ॥

श्लोक [ वसंतति० वृ० ]

॥ राहील इंदुरवि तोंवरि सौख्यनातें ॥
॥ मानोनि शाश्वत असें, उपजीवनातें ॥
॥ पे*ढींत ठेविति किती शिलकी धनातें ॥
॥ होईल काय उपयोग? पुसा मनातें ॥ १० ॥

[ शार्दूलवि० वृ०. ]

॥ व्यापारीं धन सर्व पुष्कळ असें हें निश्चयें लाविता ॥
॥ तेणें हा निजदेश-सागर सुखें होईल हे लावता ॥
॥ साधा हा परमार्थ सार्थ म्हणवा लोकीं यशस्वी करा ॥
॥ झालों त्रस्त मनांत हें उमजुनी कांहीं विचारा करा ॥११॥

आर्या.

॥ लाभेल यंत्रसाधन सर्व कलाकुशलता स्वदेशाला ॥
॥ मग धन-वर्धन होउनि जन पांघरतील हो सुखें शाला ॥१॥

श्लोक.

[ विबुधवि०. ]

॥ द्रव्य यास्तव रोख हें गणितप्रमाण धरूनिया ॥
॥ ठेविलें प्रति वत्सरीं फिरतें जरी निज देशिं या, ॥

---

१ हसूं. २ गणित श्रेढीचें प्रमाण धरून म्ह० प्रतिवर्षी ८ कोटी रुपये या उत्तरानें अधिकाधिक भांडवल वाढवून. * व्यांक इ०.

॥ वाढुनी प्रति वर्षिं सर्वधन[1] क्रमें बहु आपुलें ॥
॥ बाजु राखुनि तें प्रसंगिं करील सत्य भलें भलें. ॥ १२ ॥

## कटाव.

देशांतिल सम्पत्तीला: लागला कसा पाझर तो ॥ ध्रु० ॥

या राज्याचे अमला खालीं: एकंदर मुलुख आजकालीं, : क्षेत्रं[2] तयाचें दोन लक्ष आणि पंचवीस: सहस्त्र चौरस कोस तयांतिल: पंध्र: कोटी प्रजे पासुनी,: जे स्वधनी आपुले इमानी,: प्रति वर्षी त्या सरकाराप्रति: धाराही कर मिळून, सारा[3]: वसूल रुपये शतार्ध कोटी: खोटि न होतां शीघ्र येतसे: अशी हतोटी राज्य करायाची; हि सचोटी.: मोठी जी ही रकम, तियेच्या: पोटीं ते तीन भाग. पैकीं: भाग दोन मुरडुनिया पाठीं: या हिंदुस्थानचे ओटीं[4]: पडती भूपति—[5]कार्यासाठीं.: शेष तृतीयांश[6] धन भराटी[7]: मारुनि, पर देशाचे गांठीं: जाय; अशी दरसाल रहाटी.: युक्त असे ही परंतु आतां,: राजकीय दृष्टिनें पाहतां: सबल देश हा आश्रय दाता: मिळुन, आपणां होय त्राता. यास्तव निज देशांत स्थिरता.: सुविद्यामृता होय पाजिता,: प्रभू असादे अंबा माता;: पूर्ण कृपाही हिची पाहतां: नृपाळ ऐसा स्वशिरावरता;: परि जर तो या देशिं राहता; जरि चालविता.: राज्यांहि सत्ता,: होती[8] मग अर्थांत सुवता.: पहा, अशी कीं,: त्या षोडश कोटि धना पैकीं: दहा कोटिच्या तरी वरोती: रोजगार धंदेच निमित्तीं निज देशीय जनांचे हातीं खचित रहाती[10].: तसें परंतु न होतां पैसा सर्वांहि[9] पर देशीं शिरतो. ॥ १ ॥ देशांतिल० ॥ ध्रु० ॥

---

१ अव्वल सालापासून इच्छित कालपर्यंत प्रतिवर्षी संग्रह करीत गेलेल्या द्रव्याची एकंदर होणारी जमा. २ चौरस क्षेत्रफळ. ३ सर्व. ४ पदरीं. ५ राजकारभारानिमित्त. ६ सोळाकोटि. ७ भरारी. ८ झाली असती. ९ तोडे. १० राहिल्या असत्या.

खंडणि दाखल परद्विपातेंः सोळा कोटी निजधन जातें.ः कनक रौप्य तेंः प्रति वर्षी वसु[1] कोटी द्रव्याः सव्याज इतर देशा भरितें.ः स्वांगें झिजतेंः करितें इकडिल भांडार रितें.ः वैरतच्चरितेंः[3] कथिलीं आतांच, पहा पुरतें.ः याच रीतिनें, अन्य देशिचा सर्व माल तो.ः मोह घालितो बनुनि बहुरुपी;ः नित्य निजरुपींः एक नाविन वेष अंगिंझेंपी;ः बहु भुलथापीः देउनि, किंमत दावी सोपी;ः लोकां घालुनि गणेशटोपीः बत्तिस कोटी धन आटोपी.ः मालाची त्या सर्व नायकां[4]ः फार लायका,ः तसी माइकां,ः वाटे सकळां.ः बुधजन म्हणती तिजला सुमुखा; प्राकृत जन तेः म्हणती तीस विलायति वस्त्रा;ः लोकां पडतें भूल पाहतां;ः चित्तवेधकाः जसी मेनिका;ः तिचे मंदिरीं गिऱ्हाइकां दाटी नित अधिका;ः वेंचुन पैका मुखा भाळतीः फुका परंतु स्वसुखा मुकतीः तिटकारा करितीच बायका;ः अशी ठकाची माय एकटी,ः लटका दाखवुनी भाव, लुटीः प्रति वर्षी धन चवदा कोटी.ः शेष रकमतीः अठरा कोटीहुन ना कमतीः कशी हरण होय हें यथार्थ कथितां, व्यर्थःयेइल सर्वत्रांस त्रास.ः मी हो निश्चित या हेत्वर्थः वदतों सारांश हर पदार्थः स्वकीय शर्थः दाखवुनी हिसकावी अर्थ.ः हें येउन चित्तिं पहाः जीव बहु हा हुर हुरतो. ॥ २ ॥ देशांतिल० ॥ ध्रु० ॥

या राज्याचे अमला खालींः जे लोक, तयांची दर सालींः प्राप्ती ०—०—० प्राप्ती वरिल करानेंः शंभर कोटी रुपये कळली.ः जरी मानिलीः लोकीं ती कमती दाखविली,ः कोटि शतद्वय तथापि धरिली.ः आतां तीची करूं वांटणी,ः कळोनि येइल लागे उत्पन्नास आटणी.ःप्रति वर्षी परदेशिं खंडणीः भारी मोठी सोळा कोटीःजाय न कमती तींत दुगाणी.ः आणीक तशी होते हानी,ः रौप्य सुवर्णाचेच कार-

१ आठ. ०—०—० इनकमव्याक्स नामें सरकारी कर बसला होता त्यावरून.

णींः बहु आटीची वसु कोटीचीः निज देशाचे पाठीं गोणी लादेत-रि; त्या डागडागिणींः पावे न सौख्य अंतःकरणींः असा न कोणी-परिसा कर्णीं,ः मालक तुमचा अशा बहाणीं.ः माल विलायति आत्म शिराणीः बहु दाखवुनीःया देशाचीः करीतसे दरसालपहा-णी.ः हाल कराया हाणी सोटा,ः ऐसा खोटा,ः आपल पोटाः या देशाची कारि गाऱ्हाणीं;ः ठक तो मोठा,ः म्हणेच लोटा घ्या हातीं ज्याची अशि वाणी; कोटी बत्तीस रौप्य नाणींः जाय घेउनी.ः गाणीं यापरिः गाउनि सांगूं किती कहाणी!!ः या मानानें, ने प्रति वर्षीः उत्कर्षी परदेश आपल्या—सदना कोटी छपन्नघना.ः चतु[1]-र्थांश लागलें उदानों[2].ः देश संचयाः अशी क्षयाची होय भावना.ः तयें वेदना होउनि नाना,ः वदनावरतीः मदनाचीजी कांती ती नाः राहुनि, निस्तेजत्व येजनां;ः नसे भोजना रुची कदापी;ः तथापि काय करावि योजना,ः याची नच ये मनीं कल्पनाः कधिं विकल्प-ना.ः बहुत जल्पनों[3]ः काय करूं बाहे मधुसुदना!ः आणुनि ध्या-नां,ः देईं गुणया देशनिधानां[4].ः देशाचे आरोग्यार्थी मनिं के० स० रि० भारी झुरतो. ॥ ३ ॥ देशांतिल० ॥ ध्रु० ॥

## आर्या.

॥ एकंदर स्थितीचा करितां सुविचार मानसीं कळतें; ॥
॥ अपुलाच दाम खोटा, झगडुनि परक्यासिं काय मग फळतें ॥२॥
॥ विद्याज्ञान खरें जें, लोपुनि दिवसानुदिवस पाखंड ॥
॥ माजेच; तांम्र पितळा जागीं जणु काय पत्रि[5]—लोखंड. ॥ ३ ॥

---

१ २०० कोटि प्राप्ति पैकीं सुमारें चतुर्थांश म्ह० ५६ कोटि द्रव्यस्रूप. २ उर्ध्ववायु. ३ बडबड. ४ देशरत्नास. ५ विलायति लोखंड.

॥ तैसाच आळस रिपू बसवी शिरिं आपुल्या आधिक पगडा ॥
॥ दगडा वेंघों[1] झालें कठिण, कसें मग करूंच सुलभ गडा? ॥४॥
॥ चाळिसें[2] कोटिची जी प्रतिवर्षी होय हानि पाहा, ती ॥
॥ अविचार आळसांहीं घेतोंच करूनि आपुल्या हातीं. ॥ ५ ॥
॥ मेहनत—सती स्त्रीतें त्यागुनि वरिलीच सुस्ति ही रंडा[3], ॥
॥ आश्चर्य; इक्षुदंडा सोडुनि खावेंच काय एरंडा!!! ॥ ६ ॥

## पद. [ ३ ]

"प्रपंच साधुनि परमार्थाचा लाहो॰ या चालीवर"

॥ सततोद्योगें जरी कठिणही, कार्य सुलभ होय तथापी; ॥
॥ ऋद्धि सिद्धि त्या घरीं राबती; कोण तयाला[4] मग दापी[5] ॥ध्रु॰
॥ आंगा रंगा लावुनि ढुंगा गुंडाळिति तरुंच्या साली; ॥
॥ ज्या न पर्ण कुटिकाहि रहाया वसाति म्हणुनि वृक्षा खालीं; ॥
॥ तेच लोक या देशावरती करिति राज्य सांप्रत कालीं!!!
॥ नच आणुनि हें मनीं कसें हो बांधवजन जाता झोंपी ॥ १ ॥
॥ सतत॰ ॥ ध्रु॰ ॥
॥ प्रचंड वृक्षहि दुखंड होतो सतत घांव बसतां वरती; ॥
॥ पिपीलिका[6] नगशिखरीं[7] पोंचे त्रिधाविभक्त क्रिमि जरि ती; ॥
॥ कुरतुडुनी जाड हि दोराचीं बहु खंडें मूषक करिती; ॥
॥ सतत भ्यासें पहा मिळाल्या श्रीकृष्ण स्वरुपीं गोपी. ॥ २ ॥
॥ सतत॰ ॥
॥ मार्जार न गोधन बाळगितां नित्य कसें दुग्धा प्राशी ॥
॥ प्रवाल कीटक महा सागरीं रचिति कशीं बेटें खाशीं ॥

---

१ चढणें. २ परदेशांत जात असलेल्या ५६ कोटि रूपयांपैकीं राज—खंडणी १६ कोटि वजा करितां बाकी निव्वळ जात असलेली रक्कम. ३ वेश्या. ४ सततोद्योग करणारास. ५ धमकावणार. ६ मुंगी. ७ पर्वत शिखराकर.

॥ किल्ली वापरण्यांत असे ती स्वच्छचि माहित सर्वांशीं ॥
॥ यास्तव लागा उद्योगा; ही युक्ति कथी के० स० रि० सोपी ॥३॥
॥ सततो० ॥

## दिंड्या.

॥ अन्य देशिय जन मिळावया अर्थ ॥
॥ खपुनि रात्रंदिन करिति हर पदार्थ. ॥
॥ कुशलतेचा वर सुबकपणा मोठा, ॥
॥ परी अंतरिं पाहतां सर्व तोटा. ॥ ४ ॥
॥ सर्व एत्या वस्तु त्यां[1] निज धनातें ॥
॥ सुखें देउनि घेतों स्व साधनातें. ॥
॥ परी इकडिल वस्तुचा होय लोप. ॥
॥ कशी आझुनि नो[2] होय पुरी झोंप!! ॥ ५ ॥
॥ घरीं दारीं पाहतां, अर्थ सारा ॥
॥ दिसे पर देशिय वस्तुचा पसारा. ॥
॥ परी माया ही सर्व परी खोटी; ॥
॥ शीघ्र हातीं देईल हो नरोटी. ॥ ६ ॥

## कटाव.

॥ पर देशिय वस्तू इकडे' पसरल्या कशा अवलोका ॥ ध्रु० ॥

सुगर चितारीं'— रेखित चित्रें नकशी सारी,' रंगी बेरंगी वेल-बुटी,' काढायाची सर्वांहि खटपट' मोडुनि झटपट' छतांभिंतिंला खुलावयाला' नटुनि ठकुनि करुनि डामडौला' घुसले हो वॉलपेपर घरीं ॥ १ ॥ समया, लामण–दिवे हि दिवल्या,' पंत्या, पण त्या सर्व विझाल्या;' हंड्या आणीक मूनलाइट,' वॉलशेड सुंदर, चिमँ[3]-

१ अन्यदेशिय जनांनीं तयार करून आणलेल्या. २ होत नाहीं. ३ राकॉइलचे.

णीचे दिवे, ग्लासही' [१]ग्यासदिवे चमकूंच लागले. सुतैल–स्थलीं' शुभ्र मेणबत्या, राकॉइल,' ग्यासादिक विश्वासानें बहु,' इच्छेनुरूप दीपक राहिल,' असें स्वहस्तीं काम सर्व ही करूं लागले. ॥ २ ॥ घांट सुबक थाटदार, ऐशीं' झांशीचीं तबकें जीं खाशीं' कोतवाल घाशीरामाचे पडलीं घाशीं. केवळ [२]रांशी कॉपरब्रॉसी[३]' पात्रें, शिरलींच घरघराशीं. ॥ ३ ॥ मधुमासीं शीतोदक व्हाया' ज्या जलपूरित सुरयां आडणीवर बहु खुलती,' त्यांची चलती' जाउनि वाजे फाल्गुन बाजा. मग हो रति अति अनकुल ज्यांची' अशा कुज्यांचीं' गर्दी झाली. असलीच मजा ॥ ४ ॥ सुघड पंचपात्र्या ही पेले' गेले, तेथें ग्लास शोभले. ॥ ५ ॥ जीं ताजीं लिंबादि सरबतें लोक सर्व तीं सोडा म्हणती'; घ्या शीतल सोडावॉटर तें.' ॥ ६ ॥ गुलाबपाणी' आणिक अत्तरतर्र करींमन'; अंतरंग[४] परि त्यावरुनि उडे. प्रीतीस जडे फार लव्हॅांडर.' [५]गमे फ्लोरिडावॉटर सुंदर ॥ ७ ॥ बीन, सरोज, सतारहि वीणा,' सार सारमंडल, रुद्रविणा,' ज्यांत रंगबहु' जलतरंग, मंजुल सारंगी,' मोरचंग, करताल, मृदंग, सुघड चौघडे,' मधुर अलगुजें,' सुस्वर सनया' ध्वनीपरिसतांच अंतरंग' दंग होउनी गुंग होतसें;' इत्यादिक जीं अनेक मोहक वाद्यें [६]माजी' पडुन, पहाहो तया ऐवजीं' बाजे, तैसेच बेंडबाजे,' बिगुल, तुतान्या,' तंबुर, पडघम,' यांप्रत झालेच लोक राजी. ॥ ८ ॥ सांवतवाडी' दशावतारी' नरम गंजिफांवरती धाडी'[७] पडुनी बोकाळलेच पत्ते.'[८] निजसत्तेनें स्वहितार्थचितें' करिती धन धरुन काम फत्ते. ॥ ९ ॥ अशा ठकांची संगत धरितां देतिल ते शेवट धोका ॥ १० ॥ परदेशि० ॥ ध्रु० ॥ १ प०

---

१ धुराचे. २ हीन. ३ तांबें पितळ मिश्रित हीन धातुचीं. ४ चित्त. ५ वाटतें. रहा.

पहा, दौलतावादि, जुन्नरी, आदि करुन देशच्या कागदीं करून गिल्ला, फ्रेंच, नोट, फुलस्क्यापाशीं आपण केला स्वसुखें सल्ला. परिते हल्ला वरचेवर करूनि, धनकिल्ला फोडुनि, मारुनि जाती डल्ला. करावयाला लावणार तें शीघ्रआपणा हैदसधुल्ला[१]; अवलोका, लोकांनो हा दूरचाच पल्ला ॥ ११ ॥ बरू कामव्यांचाहो वशिला जाऊन, शिरल्या क्वीलस्टील, पेन, पेनसिलो. ॥ १२ ॥ निःशंकव्ल्याकिं क-पौडर प्रसिद्धही घरघुशी विलोकुनि सुशिला बाई-काजळशाई रडत बसेहो धाई धाई. आश्रय तिजला उरला नाहीं!! ॥ १३ ॥ तत्प्रीयतमा सखी, खरी ती स्वकार्य सद्धर्म आचरि[४] ती, ऐशा साध्वी रेती वरती झोटिंग व्लॉटिंग बवाची पापबुद्धिची नजरपुरी तीं फिरली. तेणेंडगेलीच[५] सती. कारिते काय बिचारी परिती!! स्वकिय रक्षणीं नाहीं कोणी उरला स्वधनी, विचार करुनी शीघ्र हा मनीं रक्षाया अबरूची बाणी करी तत्क्षणीं जल प्रवेश; अशीच शहाणी ॥ १४ ॥ तशाच किरमंजी रंगाच्या अइत्याच पुडया बसल्या आलित्या जागीं येडोनि ॥ १५ ॥ हस्त श्रमास मनें[६] फार विटे, यास्तव सुस्त न राहुन, फारच स्वस्त खाउनी, जनां समस्त सुखवाया आलींच पाकिटें. परि तें सुख वांया न कळो-नी स्वस्त वाटतीं. पाहुनि निद्रिस्थ आपणा तीं स्वस्तपणें धन फस्त करीतीं; तथापि होय न झोंप पुरीतीं!! ॥१६॥ बटवे, पडशा, यांचा तमाम उडेच फडशा. तुडतुडीत ऐशाच मोह पाशांत घालुनी आल्या कार्पेटब्याग हातीं. त्यांस सर्वहि लोक चहाती!! ॥ १७ ॥ ज्यांत सांठवें द्रव्य, असेच कसे[७] हि वाटवें

---

१ उर्ध्वायादिशे ब्रम्हणेनमः. २ दगडी आणि लकडी. ३ स्वदेशीय काळ्या शाईची. ४ आचरणारी. ५ डगमगली, थरारली. ६ मिजाजी हिंदु लोकांचें मन. ७ कंबरेस बांधण्याचे.

यांची वाटे खटाटोप. मग' खिशांत समय वशात पशांत हि' सहज रहाती, अशाच आटोपसार साथी[1]' मनीब्याग त्यामनीं पसंत' केल्या स्वजनीं. मग त्या नजरा उसंत घेउनि आल्या इकडे;' झाल्याहि भल्या,' तशाच निभल्या,' भल्याभल्यांच्या करीं शोभल्या ॥ १८ ॥ कशा डकाइतपणें वस्तु या' देशावर घालिति डांका? ॥ १९ ॥ परदे० २

जोडा चर्मी,' याचे मर्मी' भेद करुनी' पाया राखीन फार गर्मी;' तसा स्वधर्मी' मीच योग्य, दाउनि ही उर्मी[2]' प्रत्येकाचे' घरीं शिरुन बूट लूट करिती.' धीटपणें ते नीट जाऊनी थेट चुलीचीहि भेट घेती!! ॥ २० ॥ मलादिकानें वस्तु बहु किटे, विटे, तीस करिती स्वच्छ रिठे; तथापि हें मन त्यांवरुनि उठे.' सर्वांस पटे चरबी साबण.' झटे घ्यावया सत्येक जण.' फार आवडी[3]' ती नरम वडी' करीं घेउनी' आंगा चोळुनि आंघोळ करी.' घोळ हा बघा, धर्म अवघा बुडे यापरी!! ॥ २१ ॥ हस्तिदंत मातलाच, याची' मस्ती मोठी,' थोर घराणीं[4] पुजितो नुस्तीं.' आशि नालस्ती करुनि आपण भारी स्वस्ती' आहोंत, अशा घालुनि भिस्ती[5]' बहुत मातन्या' शरीरांतल्या' पशुच्या अस्थी.' शृंगेहितशीं' हिताशीं[6] मानुनि' फणया कंगवे या रूपानीं' सोंवळ्यांत घेतों निजहस्तीं!! ॥ २२ ॥ अधल्या[7] काळीं' घरीं सान मोठाल्या बुधल्या.' परि त्या हटल्या' बघुनि बाटल्या. गोड वाटल्या,' मनांत पटल्या,' चुलीजवळ जाऊनि खेटल्या.' कुप्या, शिशा त्या,' उशा पायथ्यां' खिशांतहि तशा सतत लोळती, वेळोंवेळीं मनीं घोळती!! ॥ २३ ॥ पूर्वापार चि फार लाडकीं' जीं होतीं लाखलोटि मडकीं,' तींच वाटतीं सांप्रत

---

१ सोबतिणी. २ अभिमान. ३ प्रीतिनें. ४ श्रीमंतांचीं घरें. ५ भिडेंत. ६ हितकर. ७ प्राचीन काळीं.

सडकीं.' ठेवाया लोणचीं मुरांबे' तसे गुळांबे, द्याया बरण्या जो तो हुडकी ॥ २४ ॥ तुझ्या कृपें ईश्वरा मुकुंदा, शिपी[1], पवन्यां[1], हरळी[1], कुंदा,' असें स्वदेशीं तृणबहु खासें' मिळे यथास्थित. करिती त्यावर कितीक धंदा;' बहुमानवतें गुरां[2] हेयांतें;' हें नकळे' आम्हा मतिमंदा.' करूनि त्याची निंदा म्हणतों,' विलायती घांसाप्रत वंदा.' काय म्हणावें या स्वच्छंदा !!! ॥ २५ ॥ फुका अशा तर्कटांत शिरूनी, पावाल निश्चयें शोका ॥ २६ ॥ प० ३

गंधकसळ्या' आग्नि जवळ या' नेल्या व्यतिरिक्त श्रम वाया, शिवाय सोंळ्या मधें शिवाया' अयुक्त जाणुनि;' चकमक ठकमक' पहावयाला लावी, यास्तव' सर्व जनां विश्रांत कराया,' इच्छित समयां समया लावुनि दीप्त कराया, पसरुनि माया' त्या जगमाया धनकमवाया, आल्या इकडेस आग काडया. शहरां खेड्यांपाड्यांवरतीं' घालूनि उड्या' घरींहि दारीं' झाल्या त्या आपल्या सौंगड्या' गड्यांहून दिन रात वराबती' यजमानांतें सुखवायातें पेटवूनि ओढायास बिड्या' देती चिलमी भरुनि गुरगुड्या.' अशा मायपाशांत गोंवुनी' नकळूं देतां हळू हळू त्या' पशापशानें या निज देशांतुनि दरसाल' एक कोटि पैशास खुशाल' जन्मभूमिला' पाठविती त्या' मशारनिल्हे कशा हुशार !! ॥ २७ ॥ यापरि हरवस्तुंचें सविस्तर' कथिल्यास कथन बहुविस्तार' होऊनि, जाईल वेळ फार., सारासार विचार पहतां' सारां[3]सार[4] कळेल हाचकीं,' हत्यार शस्त्रें, चित्रें, पात्रें, बहुविध वस्त्रें,' आदि करुनि हर पदार्थ ज्याप्रति' विलायती-या विशेषणानें दिधला थार,' त्यास समोर' पाहुन भुलती लहान थोर. अशा प्रकारें गेलें देशांतिल धनसारें.' ज्यांत सर्वदां ख-

---

१ गवताच्या जाती. २ घोड्यांना. ३ सर्व. ४ सारांश.

णखणीत गाजेच संपदा' तीं घरदारें भणभणीतशीं दिसतात सदा' येउनि ठेपे अशी आपदा,' तरी स्थिति न वाटे चि तापदा' आनं- दानें काय हंसावें स्वयें खदखदा !! अळसांत स्वस्थ बसा न कदा.' सुखं[1] दात्याच्या आठवुनि पदा' कंबर बांधा बांधव जनहो; देशाचे कल्याणासाटीं लागा उद्योगाचे पाठीं.' अशी चालवायास रहाटी' मारितसे के. स. रि. हाका ॥ २८ ॥ परदेशिय वस्तू इकडे पसरल्या कशा अवलोका ॥ ध्रु० ॥ प० ४

## आर्या.

॥ हरवस्तु विलायतची, दिसण्यांत सुरेखही सुरम्य बहू. ॥
॥ करितां विचार परि, ती केवळ वेश्या जशी तशी हुबहू[2] ॥६॥
॥ भुलतों तिचा पहतां बांधाही थाटदार तो नखरा[3], ॥
॥ दुःखप्रदपरिणामी होय परी स्वार्थ साधुनी न खरा ॥ ७ ॥
॥ तन मनधनेंच खपतों, तोंवरती आपुली जशी दारा[4] ॥
॥ क्षणपरि विसंबितां ती तत्क्षणिं सोडूनि जाय घरदारा ॥८॥

## दिंडी.

॥ स्वकियवस्तू पाहता दिसे साधी, ॥
॥ परी पतिहित ती पत्निसमाचि साधी[5]. ॥
॥ जरी केली माया न तिजवरी, ती ॥
॥ तरी आचरि निजकर्म योग्य रीती ॥ ७ ॥

## पद.

( राग सोरठ. कांहीं बोलो महाराज या चालीवर. )

जनां हिच प्रार्थना' त्वरित करोनी एकी धरणें स्वदेशाभिमाना ॥ध्रु०॥
घ्याया उद्योगशस्त्र हातीं शीघ्र उठाच. मजाहो' काय पहातां

---

१ परमेश्वराच्या. २ हुबेहुब. ३ डौल. ४ स्त्री. ५ साधिते.

दारिद्र्यरिपू खुडितो निजमाना ॥ १ ॥ जनांहिच प्रार्थना० ॥ध्रु०॥
देशाच्या संबंधें आपण सागर कूप तसे हो परंतु कूपोदक
लाजवितें सिंधुसहें माना ॥ २ ॥ जना हिच प्रार्थना० ॥ ध्रु० ॥
स्वदेशीयवस्तु यापुढेंतरि खाचित वापरूं ऐसें येक्षणिं देउनि
वचन राखणें के. स. रि. च्या माना ॥ ३ ॥ जनां हिच प्रार्थना०॥

---



श्रीशंकर.

# कथाभाग तिसरा.

आपल्या लोकांची परस्परांशीं सुविचारानें योग्य वर्तणुक, परस्परैक्य, वीरश्री उत्साहबुद्धि, देशप्रीति आणि देशाभिमान इ० गुणांचा अभाव असल्यामुळें देशाची झालेली दुर्दशा; आणि देशकल्याणा विषयींचे उपाय यांविषयीं.

पद—पूर्वरंग

"अशाश्वतसंग्रह कोण करी ! या चाली०"

॥ स्वहिता हाच उपाय खरा ध्रु० ॥

युक्तायुक्त विचारें वर्तुन अज्ञान दूर करा ॥ १ ॥ स्वहिता० ॥
लोकीं एकी ठेवुनि, चित्तीं देशप्रीति धरा. ॥ २ ॥ स्वहिता० ॥
देशहितेच्छू के. स. रि. सांगे, इर्ष्यास्त्रीस वरा ॥३॥ स्वहिता० ॥

# कथाभाग कविता.

## श्लोक.

(शार्दुल विक्रीडित वृत्त.)

श्रोते हो परिसा, कसा समय हा येऊनिया ठेपला ?
युक्तायुक्त विचार जो, सकल तो हो[1] नष्ट कीं आपला.
कोणाची परवा नुरून कवणा, वाढे बहू मीपणा;
एकी [2]बेकित मात्र एकि उरली; ये दुर्दशा आपणां ॥ १ ॥

---

१ झाला. २ या नांवाचा मुलांचा जो खेळ आहे त्यांत.

## आर्या.

देशाच्या कल्याणा तेणें प्रतिबंध येतसे मोठा.
जुंपुनिजुवीं, पराच्या सौख्यारामांत वाहतों मोटा. ॥ १ ॥
पोटासाठीं केवळ दीनत्वें गोष्ट कायच वदावी ! !
देऊन मान[१] झालों जन आपण बद्ध अन्य–नेव[२]–दावीं ॥ २ ॥
अज्ञानत्वें केवळ जन आपण वर्ततों, स्वतांविषयीं.
वार्ता न ठाउकी, मग बुद्धी कोठून देशहितविषयीं ! ! ॥ ३ ॥

## कटाव.

सांप्रतची निज देशाची' स्थिति कथितों, परिसा आतां. ॥ध्रु०॥
भरत खंड हें, सुवर्णभूमी–या नामीं गाजतसे नामी.' धामीं प्रत्ये-काचे दामीं' कमीपणा न कधींच पहातां.' स्वग्रामींही सुखद आ-श्रमीं' राहुनि आनंदें, मन रामीं' ठेवुनि, जन तत्पर निजकामीं.' भरूनि हामी[४]' हा मी के. स. रि.' या अवसरिं सांगतसें; दुसरी' भूमी कोणती' नव्हती, कीं ती' निजदेशाची करीलचि सरी[६].' यास पहातां' अन्य भूमिका[५]' लटपट होऊनि' लटलट कांपुनि' पटपट पायां' पडूनि, पोटासाठीं खटपट' करूनि झटपट' अम्ही उपाशी' याचक, ऐसी' दावुनि वृत्ती' या धनराशी देशापाशीं' दीन रवें पसँ-रिती करांशीं.' यापरि निजदेशाची असतां' पूर्व स्थिति, परि सां-प्रतकालीं' कोणी त्याचा नुरूनवाली' खालीं घालुनि मान सदोदित' वाहे खांद्यावरी पखाली.' पायीं चट्टे' खांदीं घट्टे' पडून, पाठीवरती रट्टे' बसतां, जर्जरहो प्रतिसालीं.' आटे धन–रूप सर्व रक्त फांटे काळीज,' शेष फक्त' राहे अस्थीपंजर, भारी होय अशक्त.' करितां

१ गळा. २ दुसऱ्याच्या नव्या जाड दोरीनें. ३ द्रव्यांत. ४ खात्री. ५ देश ६ सर, बरोबरी. ७ पसरीत होत्या. ८ होतो.

हे व्यक्त' दुःखद असूं टपटप नयनांतून वहाती ! ! सर्व परीहो झाली माती' ! ! कीं[1] पुसतां दुर्दशा !! पहाती' कापुसतोही करावयाला न मिळे वाती !!! खपती जन यद्यपि दिनराती,' न मिळे तरि ती' पोटापुरती' भाजी भाकर.' मग घृत साकर वार्ता कैची!! या परिची बहु चोंहीकडूनि' लागे कैंची[2].' कोठें नुरली प्राप्ती पैची.' काय कथावें!!' अशा प्रकारें' देशाची दुर्दशा उडाली.' पशा पशानें' द्रव्य वाटिलेंच, त्या ठिकाणीं एक एक पैशास महाग' लोक जाहले!! मोकालिती हाय, शोक करुनी.' अशा अनावर महद्दुःखदा'–ददातींतुनी' मुक्त होउनी' देशाची वाढेल सम्पदा' कशा रितीनें ?' हा सुविचार,' विद्याचार सुसंपन्न देशाभिमानिते बहु साचार' चौघां चार जनांचे चित्तीं' अलीकडेस करी संचार.' मग त्याविषयीं' जागोजागीं सुसभारंगीं, व्याख्यानें किर्तनेंहि होउनि' चर्चा, वाटाघाट, विवाद' अनेक वेळां होय; परंतु मुंगिहुनि असमंजस आपुल्या' लोकांची ना जाई गुंगी.' वरपंगी होय होय करिती.' परि तें दास्यत्व–भूत जंगी[3]' खिळलें आंगीं,' त्याचें [4]वारें येतां मग जो' देश हिताचा' सदुपदेश, तो' लेश न राहून' दाखविती आवेश पराचा.' क्लेश भोगिती.' सांगूंच किती ? पंचाक्षरि परमेश नृ० के० स० रि० काढो या सत्वर भूता. ॥ १ ॥
सांप्रतची निजदेशाची स्थिति कथितों परिसा आतां ॥ ध्रु० ॥

श्लोक.

( स्रग्धरा वृत्त. )

॥ देश–प्रीती स्व चित्तीं धरुनि कळवळा तद्धितोपाय[5] कोणी ॥
॥ योजूनी आचरीतां, हंसुनि जन तया बोलती कुत्सवाणी.

---

१ काय. २ तंणावें. ३ जबरदस्त. ४ संचार होतां. ५ त्याच्या हिताविषयीं उपाय.

॥ याहो देशाभिमानी, वहुपरि करितां बोध, कल्याण सांगा ॥
॥ देशाचें काय केलें? कसुनिच भरडें देशचें वस्त्र ढुंगा ॥

[ वसंततिलक वृत्त. ]

॥ या माजिं सूत तर सर्व विलायती हो, ॥
॥ कैसें स्वदेशिय तरी मग वस्त्र हें हो[1] ? ॥
॥ आम्हीन धेडगुंजरी[2] कधिं वस्त्र ऐसें ॥
॥ नेसून, घालवुं फुका दिढिनें न पैसे. ॥ २ ॥
॥ वस्त्रें विलायति किती हलकीं मृदूही! ॥
॥ टाकूनि मूर्खजन तो भरडेंच घेई. ॥
॥ यामाजिं एक तर राखुनि राजनिष्ठा ॥
॥ आम्ही सुखें बहुत पावतसूं प्रतिष्ठा. ॥ ३ ॥

( ललित वृत्त. )

॥ देश बंधुंचें वचन हें असें ॥
॥ ऐकुनी मनीं नवल होतसे.॥
॥ सद्विचार ते करिति ना जरा, ॥
॥ काय बोलणें तरि अशा नरां! ॥ ४ ॥

## आर्या.

॥ जरि पावलीच[3] लागे, तरि खर्चूं कां स्वतां रुपायास? ॥
॥ होतेंच कार्य बसल्या, मग द्यावी काय झीज पायांस? ॥४॥
॥ या प्रश्नाचें उत्तर देतां मद्बंधु सर्व निर्णय हो. ॥
॥ देशी वा[4] परदेशी—वस्त्रें त्यान्नींच कोणतीं मग हो? ॥ ५ ॥

---

१ होतें, होईल. २ विलायति हिंदुस्थानी, हिंदुब्रिटन. ३ चार आणे. ४ अथवा.

## साक्या.

॥ देशाची सम्पत्ती रक्षायास्तव देशहितेच्छू ॥
॥ तन मन हि धनें झटतां कोणी, त्याची जन करिती कूछू[1] ॥ १ ॥
॥ तत्कृत[2] वस्तू घेउनि हातीं न्याहाळूनि पहाती,
॥ नागुण घेतां न्यून तयांतिल काढायास चहाती. ॥ २ ॥
॥ म्हणती देशहितोपदेशका तो दावूनि पदार्थ, ॥
॥ हा तुमचा देशी माल पहा, यांत न कांहीं अर्थ. ॥ ३ ॥

## पद.

( मजला वरिल सुभद्रा काय? या चालीवर. )

॥ जनहो हा सुविचार करा, लोकीं जोच भला. ॥ ध्रु० ॥
॥ एका जननीचे जठरीं जन्मुनि आपण बंधु तरी ॥
॥ परका भाव मनांत धरी, तो नर भार या महिला. ॥१॥ जन०॥
॥ काढुनि आपण निजगृह-छिद्र दाखवितों परक्यांस हरिद्र. ॥
॥ इतकें मात्र करुनि दारिद्र्य वरितों, वाटे हेंच मला. ॥२॥ जन०॥
॥ यत्नीं प्रथम जरी बंधू होय न पूर्ण, नका निंदूं. ॥
॥ देउनि अमृताश्रय-बिंदू सिद्धिस न्यावी सर्व कला. ॥३॥ जन०॥
॥ देशरूप संसार महा जन हा सर्व मिळूनि पहा. ॥
॥ काय कमी मग? के. स. रि. हा होइल लोकीं साच भला. ॥४॥

## दिंड्या.

॥ कुठें मिळतां एकत्र लोक चार विफल गोष्टींचा आपला प्रचार॥
॥ परी चाले देशांत काय कोठें, नसे वार्ता लोकांत नवल मोठें!! १

---

१ हुर्यो. २ याने स्वकल्पनेनें श्रम घेऊन देशहितार्थ तयार केलेली.

॥ हेंहि कारण निश्चयें एक जाणा, स्वकिय देशाच्या असे[1] अकल्याणा॥
॥ जना दास्यत्वीं रहावया गोडी, म्हणुनि चिंता त्याविशीं त्यास थोडी २

## घनाक्षरी.

॥ सार्वजनिक सभा—लोक,' वृत्तपत्रें हि अनेक,' ॥
॥ दीर्घ फोडितींच हाक' देशहिता कारण. ॥
॥ तरी देतो ओ कोण?' म्हणति काय अम्हां वाण? ॥
॥ असतां हि जन सुजाण' करिति ना निवारण. ॥
॥ नसुनि राजाज्ञा[2]—-भंग' व्यर्थ भीतिनेंच गुंग ॥
॥ लोक होउनी, सुसंग' नकरितीच धारण. ॥
॥ असे दाखले कितीक' दाखविती भले लोक ॥
॥ नसे त्यांचा ही वांक' दैव मुख्य कारण ॥ १ ॥

## श्लोक. "भर्तृहरि"

[द्रुतविलंबित वृत्त.]

॥ गज भुजंग मयोरपिबंधनं' शशिदिवाकरयोरपिपीडनं ॥
॥ मतिमतांच विलोक्य दरिद्रतां' विधिर हो बलवानिति मे मतिः ॥१॥

## पद. ( राग कालिंगडा. )

॥ अब कैसो बिधिने घात कियो या धरतीवर ॥
॥ अझुनि तरि दैवा छळिसि, अहा!! शीघ्र कृपा दृष्टीनें पहा ॥ ध्रु० ॥
॥ कष्टवुनी अम्ही निजजननीतें[3]' करितों दुःखं[4]—वहा ॥१॥ अझु०॥
॥ चतुर्थही[5] षष्ठमरिपु[6] वडवाग्नी' अंतरीं करिती दहा ॥ २ ॥ अझु०॥
॥ लोकैक्यहि देशाभिमान हीं' गेलीं अन्य—गृहा ॥ ३ ॥ अझु०॥
॥ येउनि हें निज चित्तीं पावें' के० स० रि० दुःख महा ॥४॥ अझु०॥

---

१ आहे. २ कायद्यांतील आज्ञेचा. ३ जन्मभूमि, हिंदुस्थान देशास. ४ दुःखरूप ओझें वाहणारी अशी. ५।६ कामादिषड्रिपूंपैकीं ४ था मत्सर आणि ६ वा अहंकार.

## श्लोक.

वसंततिलक वृत्त.

॥ देशैक्य याविषयिं हो अनुमान आतां ॥
॥ एका गृहावरुनि ताडुनिया पहातां, ॥
॥ राहेन सख्य निज बंधुंत[१] पुत्रतातीं[२] ॥
॥ लोकीं कुठून मग होईल एकता[३] ती? ॥ ५ ॥

## आर्या.

॥ व्हायास द्वैतजनीं अविचाराज्ञान मूळ कारण हो; ॥
॥ न म्हणों, तरी पितासुत करिती राज्यार्थ बंधु कां रणीं[४] हो? ॥ ६ ॥
॥ सम्पत्यर्थ कुलक्षय अज्ञानत्वें करूनि कितिकांचे ॥
॥ झाले; तद्वृत्तांता परिसुन कां अंतरंग नच कांचे!! ॥ ७ ॥

## फटका.

( सवाई फंदीकृत—"पालख्या पागा स्वार रथ हत्ती०" या झोंकावर. )

॥ अविचारानें वाढुनी द्वैत लोकीं नाश होय कोण अवलोकी[५]? ॥ ध्रु० ॥
॥ पांडवीं वैर नृप दुर्योधन सहजीं करुनि, मृत्युच्या निजे सेजीं ॥
॥ बंधु—वध करुनी बापावर इतराजी; असा औरंगजेब[६] पाजी ॥
॥ पेशवे दादा[७] इंग्लिशां नातु[८]—राज्यीं घालवी करुन हांजि हांजी ॥
॥ यापरी पडले जन लक्षावधि धोकीं के. स. री. न ह्या गपा झोंकी ॥ १ ॥

## संस्कृत श्लोकार्ध

॥ अज्ञान मेवास्य हि मूल कारणं ॥
॥ विज्ञान मेवास्य हि मूल भूषणं ॥

---

१ भावाभावांत. २ बापलेकांत. ३ एकी. ४ युद्ध. ५ पाहतो, ६ प्रसिद्ध मोंगल पादशाहा. ७ राघोबा दादा. ८ आपला नातु जो सवाईमाधवराव पेशवे राज्य करीत असतां इंग्लिशांस शरण जाऊन फितल्यामुळें साष्टी वगैरे प्रांत इंग्ल० मिळाले.

## आर्या.

॥ अज्ञानाचें गृहजें स्त्रिया, तयां माजिं सतत जो[1] रमला; ॥
॥ अद्वैत सुखा मुकला. आलातें सांगण्यास जोर मला ॥ ८ ॥

## फटका.

फंदीकृत "पुण्यामध्यें बाजिराव बडोद्यामध्यें फत्तेसिंग महाराज"
या झोंकावर.

॥ स्त्री वरवंटा दिसे, परंतू एकीवर फिरवि खरंटा ॥
॥ लागे पायींच तिच्या जनजो, प्राप्त तया दुःखद वाटा ॥ध्रु०॥
॥ उत्तानें[2] पात्र भूप धाकट्या बायलि[3]च्या लागुनि नादा, ॥
॥ युव[4]पुत्रा ध्रुव बाळा मुकला, तुच्छ म्हणे मग राज्य पदा ॥
॥ कै[5]कै-वचनें धाडूनि वनीं तनया श्रीरामा सुखदा, ॥
॥ नृप दशरथ राम राम वदतां त्यजी प्राण पावुनि खेदा ॥
॥ स्त्री आनंदो बाई—नादीं लागुनि राघोबा दादा, ॥
॥ नृप नारायणराव पेशव्या मारूनि, करी ओ दा[6]र्दा ॥

( चाल. )

॥ असे कितिक जन भले भले ॥
॥ पडुनि भरीं स्त्रीच्या चकले ॥
॥ सर्व सुखा शीघ्रच मुकले ॥

॥ देश हितेच्छू वदे के. स. रि. स्त्री कंटक तीव्र सरंटा[7]॥ लागे पायींच ॥१॥

---

१ पुरुष. २ उत्तानपात्र या नांवचा, प्रसिद्ध ध्रुव बालकाचा पिता. ३ धगोचरा धाकट्या स्त्रीच्या. ४ पुढील राज्याधिकारी. ५ श्री रामचंद्राची सापत्न मातृश्री. ६ मोट हाकण्याचेसमयीं बैलांस अनुलक्षून असणारे शब्द. ७ सरांटा, गोखरू.

## श्लोक.

( शिखरिणि. )

॥ स्वराज्यीं चौघांनीं मिळवुनि धना आणुनि घरीं ॥
॥ दहांनीं तें खावें बसुनि भजुनी श्री हर हरी ॥
॥ पितृव्यांतें[1] ताताहुनि बहुत[2] मानूनि अगेळें, ॥
॥ सुखें एकोप्यानें स्वगृहिं वसती बंधुसगळे ॥ ६ ॥

## साक्या.

॥ परंतु सांप्रत काळीं पुत्र न बाप म्हणे बापाला; ॥
॥ मग अर्थातच काका मामा कोण झाडचा पाला? ॥ ४ ॥
॥ स्त्रीचा ऐकुनि बुद्धिवादतो गांठी दे पैशाला ॥
॥ सोदेर[3] बांधव चार, तयांचीं तोंडें चार दिशांला ॥ ५ ॥
॥ एक घोंगडी जुनी वापरी, दुजा पांघरे शाला ॥
॥ द्वैत यापरी, मग शांतीची पुसतां गोष्ट कशाला!! ॥ ६ ॥
॥ लागतसे अर्थात तयांच्या कलहाग्नि कुलागारा[4] ॥
॥ मत्सर—वायु—स्पर्शे त्यांचा शीघ्र होय अंगारा[5] ॥

## पद.

( रामजोशीकृत "या इष्काचे पायिं बुडाले कैक लक्षापती खंडिमधें०"
या लावणीच्या चालीवर. )

॥ उभय पक्षिं कलहास लागतां अति होउनि अप्रिती ॥
॥ लाभ मग सहजीं तिसऱ्या प्रती ॥ ध्रु० ॥
॥ बंधु बिभीषण विरुद्ध होतां लंका—पतिशीं महा[6] ॥
॥ त्वरित यश पावे श्रीराम हा[7]. ॥

---

१ चुलत्यांस. २ जास्त. ३ सख्खे. ४ कुलरूप घरास. ५ राख. ६ वडील, श्रेष्ठ.
७ प्रस्तुत मूर्तिरूप असलेला.

॥ म्हणे शिवाजी मीच पुरंदर[1]—दुर्गाधिपती पहा; ॥
॥ तुम्ही तिघे' बंधू दूरचि रहा. ॥
॥ मार्जारांचें भांडण लागुनि' पडतां बहु आग्रहा, ॥
॥ खवा मग' करी जंबुक[2] स्वहाँ[3]. ॥
॥ याचा' अनुभव पूर्ण घ्यावया' वाचुनि गोष्टी दहा, ॥
॥ सु जनहो' इतिहासांमधिं पहा ॥
॥ कळूनि येईल गोष्ट खरी कीं' खोटी के० स० रि० कथी.
॥ लाभ मग' सहजीं तिसऱ्या प्रती. ॥ १ ॥
॥ उभय पक्षिं कलहास लागतां०' ॥ ध्रु० ॥

## श्लोक.

( स्रग्धरावृत्त. )

॥ जो देश, प्रांत, किंवा नगर हि गृह वा साच ठेवूनि एकी ॥
॥ वर्ते एका विचारें; सर इतर कुणा अल्प त्याची नये कीं ॥
॥ मोळाच्या शुष्क[4] दोरें प्रबल तम असा बांधिला जाय हस्ती॥
॥ मोडूं कोणी शकेना लघुतर[5] जुडगें कांबट्यांचें स्वहस्तीं ॥ ७ ॥

( उदाहरणार्थ स्फुट श्लोक. अनुष्टुप छंद. )

॥ अल्पानामपिवस्तूनां संहतिः कार्य साधिका ॥
॥ तृणैरारभ्यते रज्जु' स्तयाना गोपि बध्यते ॥ ८ ॥

## आर्या.

( मोधशतक. )

॥ मिळतांच एक चित्तें गुणिजन समुदाय कायतो न करी! ॥
॥ निर्जीव तृणाच्या ही रज्जूनें बद्ध होय मत्त करी ॥

---

१ पुरंदर किल्ल्याचा अधिपति. २ कोल्हा. ३ गट्ट. ४ यःकश्चित जो मोळ (तृण विशेष.) त्याच्या. ५ लहानसें.

## श्लोक.

( वसंत तिलकवृत्त. )

॥ ही द्वैत बुद्धि धरितां मम बांधवां हो ॥
॥ चित्त द्रवूनि नयनांतुनि नीर वाहो ॥
॥ सत्प्रीतिभाव जरि ठेवुनि एकमेकीं ॥
॥ वागाल, अन्यन तुम्हांसम धन्य लोकीं ॥ ९ ॥
॥ घालाल हात न उणें मग ज्या स्थलांत ॥
॥ माराल ते स्थलिंच पाणि निघेल लात ॥
॥ ज्याची तुम्हांवर फिरेलचि वक्र दृष्टी ॥
॥ त्याचे तरी अवदशा समजा अदृष्टीं[२] ॥ १० ॥

## दिंड्या.

॥ पंडु सुत ते धर्मादि बंधु पांच ॥
॥ एक चित्तें वर्तती, म्हणुन साच ॥
॥ विफल होउनि हर यत्न कौरवांचे ॥
॥ शत हि मरती बंधू न एक वांचे ॥ ३ ॥
॥ जूट राहुनि फूट ना मधें होय, ॥
॥ तरी शत्रु प्रबल ही करी काय? ॥
॥ इसांपोक्तीचा[३] करा हो विचार, ॥
॥ दाद देती सिंहा न बैल चार ॥ ४ ॥

## श्लोक.

( स्वागता वृत्त. )

॥ हा करूनिच विचार मनीं बरा ॥
॥ बंधुंनो उठुनि बांधुनि कंबरा, ॥

---

१ धरीत असतां. २ कपाळीं. ३ इसापनीतींतील गोष्टीचा.

॥ ऐक्य–भाव भजनीं स्वजनीं भरा ॥
॥ व्हाल भारि[1] मग पांच हि शंभरां ॥ ११ ॥

## पद.

रागसोरट. " कांहीं बोला महाराज " या पद्धतीवर.

जनां हिच प्रार्थना काया वाचा मनें धराहो स्वदेशाभिमाना ॥ ध्रु० ॥
घ्याया सुविचार–शस्त्र हातीं शीघ्र उठाच मजा हो ।
काय पहातां!! अज्ञान–रिपु खुडितो[2] निज मानों ॥ १ ॥ जनां० ॥
देशाच्या संबंधें आपण सागर कूप तसे हो
परंतु कूपोदक लाजवितें सिंधूस हि मानां[3] ॥ २ ॥ जनां० ॥
सोडुनिया द्वैतभाव सारा लागा ऐक्य–पथा हो
पावलाचे त्यायोगें सांगे के. स. रि. सुख–सदना ॥ ३ ॥ जनां० ॥



१ जड. २ गळे. ३ समजा.

श्रीशंकर.

# कथाभाग चवथा.

देशांत कलाकुशलता, कापडादिकांचे कारखाने, यांचा अभाव होऊन देशास प्राप्त झालेलें दारिद्र्य; आणि सम्पत्त्यर्थ ते कारखाने वाढविण्याचे उपाय.

## कीर्तनरंग कविता.

पद. पूर्वरंग.

॥ जनहो उद्योगास वरा ॥ ध्रु० ॥

॥ दैवावरि ठेवूनि हवाला न बसा स्वस्थ घरां ॥ १ ॥ जन०॥
॥ यत्नाविण प्रारब्ध पंगु हें, हाच विचार करा ॥ २ ॥ जन०
॥ यत्नीं परमेश्वर अनुकुल हो संशय नाहिं जरा ॥३॥ जन०
॥ उद्यम[1] साहस[2]धैर्य विक्रम[3] बळ[4] धी[5] योगें[6] मान्य हरा[7] ॥४॥ जन०
॥ देशहितेच्छू के० स० रि० चा हा चित्तीं बोल धरा ॥ ५ ॥
जनहो ॥

## कथाभाग.

श्लोक.

(शार्दूल विक्रीडित वृत्त.)

"शार्दूलवि०" ॥ऐकायास कथा वृथा[8] न म्हणुनी[9] मद्बंधुहो लक्ष्य द्या,[0]॥
॥ देशाची स्थिति जाहली तरी कशी? जी आज ती ना उद्यां. ॥

---

१ उद्योग. २ धारिष्ट. ३ पराक्रम. ४ शक्ती. ५ बुद्धी. ६ यायोगेंकरून. ७ शंकराला. ८ व्यर्थ भाकड कथा. ९ वदून. ० स्वीकारा.

॥ जे शिल्पादिक सत्कला कुशलता ते कारखाने किती[१], ॥
॥ होऊनीच खुळेहि पंगु, करुणा आर्तस्वरें भाकितो ॥ १ ॥
॥ ऐशा या समयां मिळूनच महा उद्योग–धन्वंतरी ॥
॥ बै[२]से लेप जरी जनैक्य–विपुल द्रव्योषधींचा, तरी ॥
॥ आरोग्याप्रत पावुनी हळु हळू येईल शक्ती तयां[३], ॥
॥ देशाचें करितील ते हित; नुगें* होईल उत्क्रांत या ॥ २ ॥

## कटाव.

कोसळुनि विलायति वस्तू' आपले दडपले भारें' धंदे सारे
॥ ध्रु० ॥

सुतारकीचा' धंदा चालावयास, बंधा' रुपया देतां,' कर्वत रंधा' वांकसही किंकरें सामता' कुऱ्हाड ही कोयता आयता[४] मिळे पहातां.[५]' साता ही सागरां तराया' न भिऊन जरा, भराभरा या' देशीं येउनि चाकू कातर,' देश धनपटा' चरा चरा कातरतीं; तरि तीं' पुरतीं हितकर मानुनि त्यांतें' जन आपण म्हणतों या अर्ती[६].' त्वरा करोनी कुलूप किल्ली' घरां घरां वेष्टाया, गल्ली' एक न सोडी.' स्वभाव टाकूनि एक कल्ली' बहुरूपांनीं अस्मल्लीला दाखवूनि लोकांस भुलवुनी' पैका हिसकावूनि नेतसे.' चूक, खिळा, सुरसा, आणिक तीं' बिजागरीही तिचा सखा स्क्रू,' सरसावुनि पुढतीं तो सुरसीं' भिरवुनि, शिरसा वंद्य जहाला.' परिसा परि, तो' पैसा हरवुनि कैसा नेई.' गज[७] पट्टी, तीं' लट्टी; पण हो कट्टी मोठी.' त्वरें जनांचे गळां पडुनि बहु बसवी चट्टी.' या देशाची धरुनि आवडी' कुदळ, फावडी,' टिकाव तैसा,' सिंधूवरूनि टिकाव धरुनी' बिंदु-

---

१ कित्येक. २ बसेल. ३ त्या कारखान्यांस. ४ विलायतेहून आलेला ऐता. ५ अलीकडे, जवळ. ६ देवासमान. ७ लोखंडी गज, पट्टी. * नकमी.

मात्र अटकाव न होतां' पटकायास द्रव्य येतसे.' न्हावा गौंड्यास न खोळंबा,' म्हणुन गुण्या, ओळंबा, करणी,' करणी दाखविण्यास आपली' येउनि; ठेवी मन धन हरणीं.' सोनाराचें पूर्णच मानस' करुनि कानस, ऐरण, जंतर,' तशीं अवंतर दुजीं हत्यारें,' स्वधना अंतरविती आपणां.' आणा ध्याना. शिंप्याकरितां' कातर, अंगुस्तान, सुई ही' प्रस्थान करुनि हिंदुस्थान पहाया येई. नटुनि ठकुनि वस्तरा, नऱ्हाणी,' राज[1]र्सादिक थोर थोर आपलीं घराणीं' सांगुनि, दाखवूनि निज शिरा[2]णी' हिसकाया पैकाच नापि[3]का.' मोहुनि निज पाशांत गोंविती.' चिमटाही उपटाया धन तें' कपटानें तनमन हरवुनि, घेचिमटा' कडकावूनि पहातो.' पिस्तुल, बंदूक हि तलवार,' हत्यार, शस्त्रें, सहपरिवार' बार, वार, अनिवारच करितीं,' अर[4]वार स्वांग होय तेणें.' प्रज्वालित कुशलत्व देखणें. नानापरिचें' लोखंडी सामान यापरी' कथूं किती तें? येउनि एतें' लोहार, शिकलगार, घिसाडी,' इत्यादिक लोकांची होउनि नासाडी बहु कौडी प्राप्ति न राहुनि बसले' वाजवीत अर्जुन-वा[5]घा निज विद्या विसरुनि.' तसेंच सारें' पितळी सामान या प्रकारें, देतां फटकारे पाठीवर' तांबट आदि करुनि कारागीर' वठुनि वळ, होउन विव्हळ, बहु' कळवळूनि ते तळमळ करिती.' सर्वांहि चळवळ राहुनि हळहळ' करीत फिरती दारोदारीं.' अशी स्थिति प्राप्त होय केवळ' आलस्यें हीं अविचारें ॥ १ ॥ कोंसळुनि० ॥ ध्रु० ॥

फूलस्क्यापादिक कागद हो' येतां, कागद-कुटे महा[6]गंद' होउनि पडले. जुन्नर ही दौलताबाद आबाद दौलतीं;' शहरें नाशिक एरंडोल तयांसम तोल धनेंच डोलतीं.' त्यांचें मुंडन होउनि थिंब

१ मिस्तर राजर्स साहेबांचे कारखान्यांतील. २ मोठेपणा. ३ न्हाव्यास. ४ हुळहुळें. ५ शखातें. ६ रक्तपित्त, महारोग. ७ गबर.

निघे चौं रस्तीं.' स्वातिश्री अन्य खंड-नेगरां मंडित होय, तिला खंड नसे.' साऱ्या वेलबुटीदार तऱ्हा' ज्यांत, अशां वालपेपरांच्या' करुनि अंगिकारास, तयांचा होतां चोंहीकडे पसारा,' चिताऱ्यांस कोणीच गिऱ्हाईक' नुरूनि ते जाहले तिऱ्हाइत.' आकाशाची अशी शिरीं वसतांच कुऱ्हाड, सहवऱ्हाड तें' निज बिऱ्हाड आटो-पुनि पळती.' करी तयारी,' जीनें जिनगरा वरती स्वारी करून, चाबूक दे कोरडा.' म्हणे, ओरडा.' पोटासाठीं लीदच खरडा.' अथवा वसुनि घरीं स्वस्थरडा.' नैनक्लाक, हरक, मलमल, ती' पाहुनि भुलती.' जन. परि ती निज चलती' दाखवुनी धन कल-थी.' वनांत सुसनातनरूप[3] धरूनि जनांत वसे.' दिवसेंदिवस अनाथनाथ होऊन बसे ती.' तसे[4] पॅरी,' ती जगमाया[5] कमवाया धन तें' माया वांया लावुनि, अपल्या' पायां लावी' पुरुषांसकलां.' आयां बायांसाहि करुनी सायास वेष्टुनी झांकी काया. फोडुनि साच अफाट असें निज' देश—द्रव्य--कपाट, धनास करूनि सपाटच,' पाठ पुरवि मार्जारपाट. असा' प्रति वर्षी परिपाठ तयाचा.' रंगी बेरंगी वेलबुटेदार छीट धीटपणें थेटच' येउनि, घेउनि भेट, जनांप्रति होय अवीट.' प्रति वर्षीं अनुपम रूपातें' धरुन, हरितसे देश धना-तें' ऐसा वस्त्र प्रत्येकाचा' कथितां साग्र प्रकार, होइल' मन व्यग्र यास्तव सार पहा.' परदेशी कापड हें फडकावुन, धडकावुन चट अडका इकाडिल ने. तेणें' वस्त्रकार यांच्या पोटीं होउनि ति-डका, तडका, फडका मरती ते सारे.' मधुर सुवासिक अत्तर आ-णिक गुलाब पाणी,' यांचें पाणी दवडुनि, बुध्द्या' इंग्लिश—वाणी दाखवून जन आपण सध्यां' सुखें फ्लोरिडा वाटर हि लव्हा'डर यां

१ पॅरिस, लंडन इ० शहरास. २ खोगीर. ३ जगत्पालक. ४ त्याप्रमाणें. ५ जगन्नाथी. ६ सेन.

घ्यायां सह रुमाल पसारितों स्वपाणी.[1] गांधि जनांच्या व्यापारा संधिवात जडुनी आली मंदी. शिरीं तयांचे भरगच्ची जरतारी मंदिल, तेथें न मिळे साधी चिंधी. अशी संधि ही प्राप्त जाहली. ब्रांडी, शांपिन, वाइन, आदिकरून किती[2] तीं जलाल मद्यें शिरुनी निज देशामध्यें, बहु कलाल हाका मारुनि म्हणती, अवलोका लोकांनो; गेला पैका पर देशांत आमचा. बहु विध रंगी वर्तुल ही नागमोड ढंगीं सान थोर बांगड्या बिलोरी, इकडे आल्या. भल्या वाटल्या. झाल्या त्या सौंगड्या स्त्रियांच्या. परंतु ऐका, मण्यार लोकां याञ्चा[3] बहु करण्यास लाविती. प्रपंचांतली वर्णूं हीदुर्दशा कायमी!! नेसाया पंचा, पण तोही न मिळे धड. हें उघड पहा हो. पीप, टीप, बाटली तशा नाना परिच्याच शिशा हि कुप्या त्या, होडानि ह्या बायका, हुशार कशा बहु ऐका. मिशा बुधलकाराच्या उपटुनि, घालुनि हात खिशांत खुशाल पशानें पैशा देशा नेती. सांगे के० स० रि० उद्योगाप्रति अझुनि तरी व्हा सामोरे ॥ २ ॥ कोसळुनि० ॥ ध्रु० ॥

## आर्या.

॥ हरएक या प्रकारें विलायती वस्तु करुनि सीमा[4] ती ॥
॥ ये इकडे, परि झाली संपत्ति हरूनि देशची माती ॥ १ ॥
॥ पर वस्तु—शत्रुचा बहु होतां भडिमार, सर्व चोंहिकडे ॥
॥ पांगूनि देश धनचमु, तळावरी शेष राहिलेच खडे. ॥ २ ॥

## दिंड्या.

॥ अशी देशची दुर्दशा मनांत ॥
॥ खरी येडानि दुःख हो[5] अतोनात. ॥

---

१ स्वहस्त. २ कित्येक. ३ याचना. ४ कमाल. ५ होते.

॥ परी कारण आपणच लोक यास, ॥
॥ नसे कोणा, बोल हा नशीबास. ॥ १ ॥
॥ दोष दैवा तरि काय म्हणुनि द्यावा! ॥
॥ काय त्याचा आपला असे दावा?
॥ असे यत्नाविण कर्मसाच पंगू, ॥
॥ जनां माहित हें मीच काय सांगूं!! ॥ ४ ॥

पद.

( उद्धवा शांतवन करि जा त्या गोकुल वासि जनाचे. या चालीवर. )

॥ फल प्राप्ति यत्नाविण ही होईल कशी तरि सांगा? ॥ ध्रु० ॥
॥ बीज ना पेरतां सहजीं देइल कां पीक धरत्री? ॥
॥ करिल कशी छाया वाया धरिल्याविण हातीं छत्री?
॥ होतेंच कार्य होणारें, मग कशास पूजा—पत्री? ॥

[ चाल बदलून. ]

॥ मांजरा दुग्ध दे कोण? ॥
॥ मुंगीस न कांहीं वाण, ॥
॥ जन आपण असुनि सुजाण, ॥
॥ सोडितोंचि यत्न—सुसंगा. ॥ १ ॥ फल प्राप्ति० ॥
॥ मृत होतां पति, सावित्री होय कशी सौभाग्यवती? ॥
॥ रुक्मिणी कृष्ण पति व्हाया, पत्रिका लिही कां सवंती!॥
॥ जरि न भीष्म—शिबिरा जाती निशिं कृष्णा जगते न पती.॥

---

१ नजर नजराणा. २ निराळी. ३ भीष्माचार्यांच्या डेऱ्यांत. ४ रात्री. ५ द्रौपदी. ६ पांडव.

( चाल बदलून. )

॥ ध्रुव होय अढळ पद—धारी. ॥
॥ कच शिके संजिवनि सारी. ॥
॥ निज पितर भगिरथ तारी ॥
॥ बहु यत्नें आणुनि गंगा[1]. ॥ २ ॥ फल प्राप्ति०

॥ हरि असेल माझा, तरितो देइल मज बाजेवरती.
॥ वदुनि असे स्वस्थचि बसतां होईल सकल आसे[2] रिती[3] ॥
॥ देव म्हणे, मी अनुकुल त्यां जे सततोद्योगा वरिती. ॥

[ चाल बदलून )

॥ बंधु हो भुलुनि पर—पाशा, ॥
॥ कां बघतां अझुनि तमाशा! ॥
॥ उद्योगा लागा; आशा ॥
॥ के० स० रि० ची न कदां[4] भंगा ॥ ३ ॥

॥ फलप्राप्ति०

श्लोक [ संस्कृत कवि. ]

॥ आलस्य मेव प्रत्यक्षो मृत्युरस्ति शरीरिणां ॥
॥ येन नैवास्ति भोगोपि नास्ति मोक्षः कदाचिन ॥ १ ॥

दोहरा [ अन्य कवि. ]

॥ हाल चले, सबकुच मिले. बैठे दाताकोन? ॥
॥ धंदे पीछे लछमि बसे, जो[5] पंखेमो पोंन ॥ १ ॥

---

१ भागीरथी. २ आशा. ३ व्यर्थ. ४ कदापि. ५ जसा.

## आर्या.

॥ उद्योग शब्द झाला जडुनि उद्[1]पसर्ग योग शब्दास. ॥
॥ शब्दार्थ, प्रति कार्या करणें संयोग होउनी दास. ॥ ३ ॥
॥ उद्योग तरि असावा ऐसा कीं, ज्यामधें घडे स्वहित ॥
॥ कल्याण हि देशाचें होउनि गाजेल नांव या महिंत ॥४॥

## कटाव.

उद्योग स्वकरीं ऐसें[2]' धरुन जगीं सुरसे मिरवा' दैन्य न उरवा ॥ध्रु०॥

युरोप खंडें करुनि उदंडा अति यत्नातें' उद्योगरूप दंडा[3] फिरवुनि' भंडावुनि सोडिलें आपणां.' त्यांत हि झेंडा' कापड आणिक लोखंडानें लावुनि, गंडा सर्वपरी घातलाच. यास्तव' भावंडांसह[4] निज कल्याणा'स्तव आपणहो' करुनि वक्रतुंडाचा स्तव, तो', सोडूनि वितंडा वादातें' सदरीं दर्शित[5]' त्याच उभय उद्योग–औषधी' केल्या जरि अवकाश न करितां प्राशन आधीं', दरिद्रता व्याधीचें नाशन' अझूनि होइल'. उद्योगाची जननी श्री, तीं' संतुष्ट मनें राहील निजाश्रित होउनि. मग' अनिष्ट ऐसी' नष्ट दशा अवशिष्ट न राहुनि,' सततोद्योगें दिवसें दिवस ज्ञान विशिष्ट अशा ज्या त्या चौसष्ट कलांत वरिष्टपणा आपणांस येतां' श्रेष्ट पदातें पावुनि, धारिष्ट वास अंगीं' करुनी, तत्सहवास सतत घडल्यास हळु हळू' दरवळतां परिमळ तो भारी' मिष्ट, परंतू परदेशस्थाचि शिष्ट अवंतर' लोक, सकल फिरले मन्वंतर' वदुनि असें, कष्ट पावुनि मनीं म्हणतिल बापा प्रभो काय हें आम्हावरति

---

१ उत् हा उपसर्ग. २ वर ४ थ्या आर्यंत दर्शविल्यापद्धतीचे. ३ सोटा. ४ सर्व देशबांधवांसह. ५ कापड आणि लोखंड यासंबंधी. ६ हिंदुलोक उद्योगी होऊन कलाकुशलतेंत प्रविण झाले असें विषीं वृत्तांतरूप गंध.

आरिष्ट गुजरलें!!! उमजुनि. गोष्ट स्पष्ट मनीं हीं बांधव जन हों, तया उभय उद्योगां लागायास भिडुनि कच्छास तयाचा पिच्छा घ्या हो. स्वच्छांतः करणें ही सर्वांहि के० स० रि० ची इच्छा पुरवा. ॥ १ ॥ उद्योग स्वकरीं ऐसें धरुनि जगीं सुरसें मिरवा ॥ध्रु०॥

## श्लोक.

[ उमावृत्त. ]

॥ वस्तु विलायतच्या दुमदार सुरेखाहि अल्पधनें मिळती, ॥
॥ यास्तव केवळ लोक मनें तिकडेच सहाजिक हो वळतीं. ॥
॥ ना दिसण्यांत पसंत अशा, निजदेशिय वस्तु महाग तशा.॥
॥ बांधव हो अतएव पहा अपणांस खरी जडली कुदशा.॥ ३ ॥

[ वसंततिलक ]

॥ हा घोंगत्या[1] कामिपणा खलरूप बाऊ[2] ॥
॥ घालावयास्तव उभारुनि आत्म बाहू ॥
॥ धैर्यें सरोत पुढतीं निज देश-भाऊ; ॥
॥ त्यांची प्रभू सतत हिंमत ही निभावूं. ॥ ४ ॥

( मंदारमाला किंवा अश्वधाटी.)

॥ कारागिर प्रविण होवोनिया कारखाने स्वदेशांत ते स्थापन॥
॥ व्हायास त्याच्या उपायास आधीं त्वरें शोधिलें पाहिजे आपण॥
॥ विद्या कलायुक्त इंग्लंड देशांत आमेरिके माजिं तैसे बरे[3] ॥
॥ धाडूनि कांहीं उमेद्वार यांत्रीक विद्या शिकोनी करावे पुरे ॥५॥
॥ येतां सुयांत्रीक विद्येंत होऊनि निष्णात देशी उमेद्वार ते, ॥
॥ विद्याकला मांदिरीं त्यां[4] शिराया स्व लोकांस होईल हो द्वार तें.॥

---

१ घोंगड्या. २ बागुलबोवा. ३ होतकरू व विद्वान असे. ४ त्या विद्याकला मंदिरीं.

॥ आणूनि ही करुनि यंत्रें नवीं चालवावेच ते कारखाने स्वतां, ॥
॥ प्रत्येक वस्त्रीं पदार्थींहि शस्त्रीं जनां दाखवावी स्ववर्चस्वता ॥६॥
॥ उद्योग हे चालवायास आतां धनाची अपेक्षाच लक्षावधी. ॥
॥ तें प्राप्त होईल कैसें तरी, पाहिजे या विचारास केलें अधीं. ॥
॥ चित्तीं खरी देश कल्याण इच्छा धरुनी सुसंस्थानिकांनीं स्वतां॥
॥ श्रीमान ही साहुकारीं उदारीं पुढें जाहलें पाहिजे सर्वथा ॥ ७ ॥

## आर्या.

॥ एका शिरींच ओझें बहु होतां त्या न तोलवें खास ॥
॥ तें पांच चार मिळूनी नेती पावुनि न अल्प दुःखास ॥५
॥ थोडें थोडें मिळवुनि वसती एकत्र बंधु जरि चवघे, ॥
॥ उत्तम पोषण होउनि सुख पावे तत्कुटुंब बहु अवघें. ॥६॥
॥ तद्वद्देश—कुटुंबा चालविण्या देश बांधवांनो हे ॥
॥ द्याया साह्य स्वकरां करा पुढें, समजुनी अहित नोहें.॥७॥

## दिंड्या.

॥ फार द्याया बंधुहो सांगतों न. ॥
॥ नको मोहर, पुतळी हि नको होन, ॥
॥ नको रुपया, नलगेच अधेलीही, ॥
॥ पावली ना चवलीहि नको कांहीं. ॥ ५ ॥
॥ पहा घालित ओझें न फार कोणा. ॥
॥ नको एकहि, अर्धा न पाव आणा. ॥
॥ परी आतां विनवणी जीच पायीं, ॥
॥ देश कल्याणच होय त्या उपायीं ॥ ६ ॥
॥ प्रती मासीं दर माणसीं स्वतंत्र ॥
॥ बंधुजनहो द्या एक पई मात्र. ॥

॥ हेंहि मागतसें पांच साह साल. ॥
॥ केसरीच्या वचनास या हंसाल. ॥ ७ ॥
॥ सर्व आपण या भरतखंडवासी ॥
॥ वीस कोटी लोकांत, प्रती मासीं ॥
॥ एक एक पई करूनि या लक्ष, ॥
॥ सर्व रुपये होतात [1]देहा लक्ष. ॥ ८ ॥

## श्लोक.

[वसंततिलक.]

॥ पैसा जमा करुनि यापरि, तदवस्था ॥
॥ लावावयास्तव धरूनि मनांत अस्था,
॥ सद्योजना करुनिया, तजवीज सारी ॥
॥ केली-हेंवी कसकशी कथितों पुढारीं ॥ ८ ॥

## आर्या.

॥ प्रत्येका जिल्ह्याची एकेक असूनि सार्वजनिक सभा ॥
॥ तिजला पुढच्या गोष्टी करावया जन मतें हवीच मुभा. ॥ ८ ॥
॥ प्रत्येकीं तालूकीं संभावित ही कुलीन लोकांची ॥
॥ नेमुनि सभा, करावी नेमणुक हि कारकून एकाची. ॥ ९ ॥
॥ त्या तालुका सभेच्या पेट्या मोहोरबंद फेंट वरती ॥
॥ लावाव्या हम गांवीं, ठेवावी नजर पाटिलें पुरती. ॥ १० ॥
॥ त्या पेट्यांत फटींतुनि दर माहीं माणसीं पई एक ॥
॥ टाकावि. टाकितिल हि स्वदेशहितधर्म समजुनी लोक. ॥ ११

१ अजमासें. २ पाहिजे. ३ चोर.

॥ दोहा पंधा गांवांवर प्यादा एक एक, जामिनकी ॥
॥ घेउनि नेमावा, त्या पेट्या आणावयास तालूकीं ॥ १२ ॥
॥ प्रति मासिं शिपायांनीं त्या पेट्या तालुका सभेमाजीं ॥
॥ आणाव्या, लावाव्या नेऊनि असूनि दक्ष निज काजीं. ॥ १३॥
॥ उघडूनि सभेमध्यें पेट्या असतील त्यांत ज्या रकमा, ॥
॥ तालूक्यास कराव्या कीर्दीला गांववार सर्व जमा. ॥ १४ ॥
॥ ऐशाक्रमें तिमाहीं तालूक्यांतून सर्व पैशाचा ॥
॥ भरणा जिल्ह्याप्रति तो व्हावा तपशील दाखवुनि साचा. ॥१५॥
॥ देउनि ह्या द्रव्यातें "स्वदेश भांडार-पेढि" हें नाम ॥
॥ तद्रक्षणा शिपाई ठेवावे कारकून ही मुनिम. ॥ १६ ॥
॥ जिल्हासंबंधें हें सार्वजानिक देश भांडवल, त्याची ॥
॥ स्वदेशहित कार्यांतचि व्हावी [1]खर्चीन अन्य भलत्[2]याची. ॥ १७॥
॥ म्हणुनी स्थाइक थोर हि विद्वान विचारवंत निस्पृह ते ॥
॥ जिल्ह्यांतिल लोक तिनें निवडावे शोधुनी स्वकीय मतें ॥ १८ ॥
॥ ऐशा निवडक नियमित लोकांचा त्या धनावरि यथार्थ ॥
॥ अधिकार तो असावा, व्यय हि करायास देश कार्यार्थ ॥ १९॥
॥ सार्वजनीक सभेची होतांच अगाउ सूचना त्यांहीं ॥
॥ यावें व्यत्यय नाणुनि जिल्ह्या प्रति नेमकेंच सामाहीं. ॥ २० ॥
॥ पाहूनि सर्व त्यांहीं मागील हिशेब, शिलक लेशांहि ती. ॥
॥ कमजास्त सूचना त्या द्याव्या ठेवूनि लक्ष देश-हितीं. ॥ २१ ॥
॥ देश हिताचीं कामें जीं जीं करणें पुढील सामाहीं ॥
॥ सोंपावीं सार्वजानिक सभेस मंजूर करुनि रकमाही ॥ २२ ॥
॥ याहून ही व्ययस्था करणें बहुतांपरी अवश्यक, ती ॥
॥ सोंपवितोंच कराया बंधुजनांवरि. कथूंच कविनें किती!! ॥२३॥

---

१ व्यय, खर्च. २ दुसऱ्या एखाद्या कामीं.

## श्लोक.

[ स्रग्धरा. ]

॥ या माझ्या सूचनेचा करातिलचि जरी बंधु हे अंगिकार, ॥
॥ ऐसें होतील सारे उपरि कथियेले[१] शीघ्र साध्य प्रकार ॥
॥ देवा सर्वेश्वरा हे, सुखकर नमितो के० स० रि० त्वत्पदास,
॥ दासाची पूर्ण सारी झडकरिंच करीं देशकल्याण-आस[२] ॥९॥

## पद.

राग सोरट. “ कांहीं बोला महाराज. ”

जनां हिच प्रार्थना' करुनि शीघ्र एकीस धराहो' स्वदेशाभिमाना
॥ ध्रु० ॥

॥ दैवावरि ठेवूनि हवाला' न बसा स्वस्थ घरा हों', ॥
॥ यत्नाविण प्रारब्ध पंगुहें सत्यचि हें माना ॥ १ ॥ जना० ॥
॥ घ्याया उद्योग-शस्त्र हातीं' शीघ्र उठाच; मजा हो ॥
॥ काय पहातां? आळस-रिपुहा' खुडितो निज माना ॥ २ ॥ज०
॥ देशहितार्थ प्रति मासीं कीं' एक पई प्रत्येकीं ॥
॥ देउं अशा वचनेंच राखणें' के० स० रि० च्या माना ॥३॥ज०




---

१ सांगितलेले. २ इच्छा.

# चन्द्रिका पुस्तकांतील अशुद्ध शब्दादिकांचें शुद्धिपत्रक.

| पृष्ठ. | ओळ. | अशुद्ध. | शुद्ध. |
|---|---|---|---|
| ३ | ७ | वावुगी. | वावुगीं. |
| ,, | १२ | सम्पतीच्या. | सम्पत्तीच्या. |
| ४ | ९ | पांचशां ताहिशूर. | पांचशांतहि शूर. |
| ४ | १८ | उंची. | उंचीं. |
| ५ | ५ | धारानगरीं. | धारानगरी. |
| ५ | १० | जरिकांठीं. | जरिकांठी. |
| ६ | १० | भरून. | भरून. |
| ७ | १ | अम्हांवरि. | आम्हांवरि. |
| ७ | ७ | होऊनि. | होउनि. |
| ७ | ११ | होऊनि. | होउनि. |
| ८ | १० | यवनांदि. | यवनादि. |
| ९ | ७ | साप्रंत. | सांप्रत. |
| १० | ४ | आज्ञानि. | अज्ञानि. |
| १२ | २ | हा. | ०(हा शब्द नको.) |
| १५ | १७ | तुम्हा. | तुम्हां. |
| १५ | २३ | तुम्हास. | तुम्हांस. |
| १६ | २१ | त्याची. | त्याचीं. |
| १८ | ७ | विचार. | सुविचार. |
| १९ | १८ | षूर्ण. | पूर्ण. |
| २१ | ४ | कोणी. | कोणि. |
| २२ | १२ | हे लावता. | हेलावता. |
| २३ | १९ | सुबता. | सुबत्ता. |
| २४ | ५ | घालिते. | घालतो. |

| पृष्ठ. | ओळ. | अशुद्ध. | शुद्ध. |
|---|---|---|---|
| २५ | १६ | आरोग्यार्थी. | आरोग्यार्थ. |
| २५ | १९ | परक्यासि. | परक्याशीं. |
| २७ | ११ | वस्तुचा. | वस्तुंचा. |
| २७ | १४ | वस्तुचा. | वस्तुंचा. |
| २८ | ४ | सुवक. | सुबक. |
| २८ | ७ | आडणीवर. | आडणिवर. |
| २८ | १२ | करीं. | करी. |
| २८ | १२ | त्यावरूनि. | त्यांवरूनि. |
| २९ | ६ | जाऊन. | जाउन. |
| २९ | ९ | सद्धर्मे. | सद्धर्में. |
| २९ | १९ | पुरीतीं. | पुरी तीं. |
| २९ | २१ | सर्वेहि. | सर्वेंहि. |
| ३० | ७ | मर्मी. | मर्मीं. |
| ३० | ७ | करूनी. | करूनी. |
| ३० | ८ | स्वधर्मी. | स्वधर्मीं. |
| ३० | ९ | जाऊनी. | जाउनी. |
| ३० | १२ | प्रत्येक. | प्रत्येक. |
| ३० | १४ | अवघा. | आवघा. |
| ३० | १६ | भिस्ती. | भिस्तीं. |
| ३० | १६ | मातन्या. | मातल्या. |
| ३० | १७ | हिताशीं. | हितशीं. |
| ३० | १७ | रूपानीं. | रूपांनीं. |
| ३१ | ५ | आम्हा. | आम्हां. |
| ३१ | ५ | मतिमंदा. | मतिमंदां. |
| ३१ | ७ | शिरूनी. | शिरुनी. |
| ३१ | ११ | दीप्त. | दीप्त. |

| पृष्ठ. | ओळ. | अशुद्ध. | शुद्ध. |
|---|---|---|---|
| ३१ | १४ | वराबती. | राबती. |
| ३१ | १८ | वस्तुंचें. | वस्तुचें. |
| ३२ | ११ | पहतां. | पहातां. |
| ३२ | १६ | पाहता. | पाहतां. |
| ३४ | १२ | इर्ष्या. | ईर्ष्या. |
| ३४ | १६ | येऊनिया. | येऊनियां. |
| ३५ | १४ | भूमी कोणती. | भूमि०. |
| ३५ | १७ | दीन खें. | दीन रवें. |
| ३६ | १ | हेव्यक्त. | व्यक्त. |
| ३६ | ५ | क्कैंची. | कैंची. |
| ४२ | १७ | कार्य साधि० | कार्यसाधिका. |
| ४३ | ४ | जंबुक. | मर्कट. |
| ४३ | १८ | स्तयाना गोपि. | स्तया नागोपि. |
| ,, | २२ | देशची. | देशाची. |
| ४५ | ११ | पावलचि. | पावालाचि. |
| ४६ | १२ | ०धीयोगे. | ०धीयोगें. |
| ५२ | १७ | कदाचिन. | कदाचन. |
| ५३ | १९ | दखळतां. | दरवळतां. |
| ५४ | १ | उमजुनि. गोष्टस्पष्टमनीं ही. | समजुनिगोष्टस्पष्टमनीं ही |
| ५६ | ९ | तद्यवस्था. | तद्वयवस्था. |